महाराष्ट्रांतील पहिला लिंगायत संत शांतलिंगकृत

# कर्णहंस

( … चरित्रासह )



संपादक व चरित्रलेखक

नरहर सदाशिव जोशी,

खर्शीकरशास्त्री

महाराष्ट्रांतील पहिला लिंगायत संत शांतलिंगकृत

184.

# कर्णहंस

## ( शांतलिंग-चरित्रासह )



संपादक व चरित्रलेखक

नरहर सदाशिव जोशी, खरशीकरशास्त्री

प्रस्तावनालेखक

ना. रा. वामणगांवकर, संपादक ' उदय,' उमरावती.

प्रथमावृत्ति

शके १८६८ ] किंमत एक रुपया [ सन १९४६

मुद्रक
नारायण लक्ष्मणराव कोकाटे,
हनुमान छापखाना,
३०० सदाशिव पेठ, पुणें २.



पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें

उदय कार्यालय, उमरावती ( वऱ्हाड ).

सुदर्शन कार्यालय, सोलापूर.

वीरशैवगर्जना कार्यालय, बार्शी, जि० सोलापूर.



प्रकाशक
नरहर सदाशिव जोशी, खरशीकरशास्त्री,
मु. पो. खरशी, जि. सातारा.

# अनुक्रमणिका



ॐ ॐ ॐ

## कर्णहंस ग्रंथाची विषयानुक्रमणिका

---

## चित्रपरिचय

१ श्रीशांतलिंग. ( राजाराम प्रासादी यांच्या ग्रंथानुरूप )

२ श्री. सरस्वतिबाई ( मोठ्या माय ). ह्या थोर अधिकारसंपन्न होत्या, त्यांनीं त्यांचे नातू श्रीमंत रा. ब. बाबासाहेब देशमुख हे अल्पवयी असतां जहागिरीची व्यवस्था उत्तम ठेवून घराण्याचा नांवलौकिक वाढविला. त्या दानशूर असून त्यांचे ठिकाणीं भूतदया अपार असे, त्यांचे धार्मिक आचार तर फार श्रेष्ठ असत. त्यांना सर्वजणच मायबाई म्हणत. त्या एक वर्षापूर्वी शिवलोकीं गेल्या. त्यांच्या स्मरणार्थ कर्णहंस पुस्तकप्रकाशनास त्यांचे नातू दानशूर श्री. बाबासाहेबांनीं साह्य केलें आहे.

३ रा. ब. दत्तात्रय कृष्णराव देशमुख, जहागिरदार पारवा.

श्री संत शांतलिंग महाराज, शिखर शिंगणापूर



रुद्राक्षभूषणें जटाभार । विभूतिलेपन व्याघ्रांबर ।
शंखपाणि कौपिन सुंदर । ज्ञानविचार त्रिनयन तो ॥

श्रीमंती धर्मनिष्ठ सरस्वतीबाई (मोठीमाय)
देशमुख, पारवा जहागीर,
जि. यवतमाळ



निधन— पौष व. ९ रविवार, शके १८६७.



श्रीमंत दानशूर रा. ब. दत्तात्रेय कृष्णराव
ऊर्फ बाबासाहेब देशमुख,
जहागीरदार



पारवा जहागीर, जि. यवतमाळ

श्रीमन्मातृभ्यो नमः

# संपादकाचें हृद्गत

**नमःश्रीशांतं भज विश्वनाथं। भक्तानुकूलं निजबोधरूपम्।**
**भजज्जनानां सकलार्थसिद्धिं। श्रीशांतलिंगाय नमो नमस्ते॥**

श्रीसंत शांतेश्वर ऊर्फ शांतलिंगमहाराज यांचा 'कर्णहंस' ग्रंथ मला प्रसिद्ध करण्याचें भाग्य प्राप्त झालें आहे ही श्रीमज्जननी त्रिभुवनसुंदरी मातेचीच कृपा होय.

चार वर्षांपूर्वी श्रीदासपंचायनांतील भागानगरचे सुप्रसिद्ध संत श्रीकेशवस्वामी-महाराज यांची कविता मी प्रसिद्ध केली.श्रीकेशवस्वामींच्या कवितेचें बाड कै.धर्मवीर वामनराव नाईक यांनीं मोठ्या प्रयासानें संग्रहित केलें होतें. कै. नाईक यांचे सुपुत्र बॅ. श्रीधर वामन नाईक, बी. ए , जहागिरदार, हैदराबाद यांनीं पूज्य पित्याच्या इच्छेप्रमाणें बाडाचें प्रकाशन केलें. त्या बाडांत केशवस्वामींच्या कवितेंशिवाय आणखीहि बराच संग्रह आहे. त्यांत कांहीं प्रकाशित व कांहीं अप्रकाशित संग्रह आहे. अप्रकाशित संग्रहापैकीं श्रीशांतलिंगस्वामीमहाराजांचा 'कर्णहंस' हा लहानसा ग्रंथ आज प्रकाशित होत आहे.

श्रीशांतलिंगमहाराज यांच्या जन्माचा पत्ता लागत नाहीं. तरी पण लहान-पणापासून समाधिपर्यंतचें त्यांचें आयुष्य लिंगायत-जंगमजातींत गेलें आहे. तेव्हां ते लिंगायतच म्हणावे लागतात. श्रीनामदेवमहाराज अयोनिसंभव होते. पण दामाशेटी या शिंप्याचे घरीं त्यांचा काल गेल्यामुळें त्यांना नामदेव शिंपीच म्हणतात, तसाच हा प्रकार आहे.

श्रीशांतलिंगांचा जन्म, निधनतिथी व शक मिळत नाहीं. पण श्रीएकनाथ-महाराजांचे गुरु श्रीजनार्दनस्वामी यांचे ते समकालीन होते. जनार्दनस्वामींचा काल शके १४२६–१४९७ हा आहे. तेव्हां श्रीशांताप्पामहाराजांचाही हा काल मानण्यास हरकत नाहीं. श्रीजनार्दनस्वामींची समाधि होऊन सुमारें पावणेचारशें वर्षे झालीं. त्याचे पूर्वीच शांतलिंगांचा जन्म झाला असला पाहिजे. तेव्हां शांतलिंगानीं कर्णहंस ग्रंथ लिहिला त्यास सुमारें पावणेचारशें वर्षे झालीं असलीं

पाहिजेत. म्हणजे सुमारें चारशें वर्षांपूर्वीच्या लिंगायतानें मराठी भाषेंत लिहिलेला हा आद्यग्रंथ आहे हें येथें मुद्दाम नमूद करण्यासारखें आहे.

कर्णहंस या ग्रंथाची भाषा चांगली आहे. विषय पंचीकरणाचा आहे. त्यांत अनेक विषयांची छाननी केलेली आहे. त्याचा उपयोग जिज्ञासु साधकांना अवश्य होण्यासारखा आहे. ग्रंथ लहानच आहे. पण त्याची मांडणी मनोहर आहे व त्यांतील रहस्य लक्षांत आल्यास परमार्थतत्त्वें सहज दिसूं लागतील, अशा अपूर्व योग्यतेचा हा ग्रंथ आहे.

लिंगायत पंथ अवैदिक आहे असा एक समज आहे. लिंगायत व वैदिक यांचे ठिकठिकाणचे तंटे प्रसिद्ध आहेत व ते कोठपर्यंत चालणार याचें उत्तर देतां येत नाहीं. पण या तंट्यांचें वैयर्थ्य या ग्रंथरूपानें दिसत आहे तें येथें दाखवून पुढें ग्रंथाबद्दल थोडेसें लिहीत आहें.

सर्व धर्माचीं व पंथांचीं आद्यतत्त्वें एकच अविनाशी आहेत, याबद्दल बिलकूल मतभेद होण्यासारखा नाहीं. ज्या पुरुषाच्या हीं तत्त्वें लक्षांत आलीं तो दुसऱ्या पंथाचा द्वेष मुळींच करणार नाहीं. एकपणाविण एक असणारा परमात्मा व अनंतत्वाला आला आहे. त्या एकाचींच नांवें राम, कृष्ण, हरि, शिव, बुद्ध, झोराआस्टर, अल्ला व येशू अशीं आहेत. नांवांचा भेद असला तरी ज्याचीं हीं नांवें आहेत त्या प्रभु परमात्म्याचा भेद होत नाहीं. जसें एका स्त्रीस कोणी आई, कोणी मावशी, मामी, आत्याबाई, वहिनी म्हटलें तरी जशीं त्या स्त्रीचीं या म्हणण्यानें रूपें बदलत नाहींत तसेंच निरनिराळ्या पंथांनीं परमात्म्याचीं आपल्या आवडीप्रमाणें नांवें ठेविलीं असलीं तरी मूळ स्वरूपांत भेद होत नाहीं. ही उच्च दृष्टि ज्या पुरुषांना आली त्यांच्यांत तंटे उत्पन्न होऊं शकत नाहींत. सूफी पंथाचीं उच्च तत्त्वें मुसलमानांनीं अंगीकारलीं तर केव्हांहि हिंदु-मुस्लीम वाद राहणार नाहीं. वरील उच्च दृष्टि लिंगायत व वैदिक या दोघांना जर आली तर वादाचें बीजही उरणार नाहीं.

या परमोच्च भूमिकेवर लिंगायत शांतलिंगस्वामी अधिष्ठित झाले होते म्हणून वैदिक धर्मीय ब्राह्मणही त्यांचे शिष्य होऊन त्यांची आज्ञा मानूं लागले. श्रीजयरामस्वामी वडगांवकर यांचे गुरु कृष्णाप्पा हे ब्राह्मण वैदिक परंपरेंतील

असून त्यांनीं शांतलिंगमहाराजांचे चरणीं मस्तक विनम्र करून त्यांना उच्चतर असें गुरुपद दिलें. त्यामुळें लिंगायत पंथाबद्दल अनादर असण्याचें कारण नाहीं, एवढा बोध त्यावरून घेण्यास हरकत नाहीं. उलटपक्षीं पाहतां आपल्या लहानशा ग्रंथांत शांतलिंगमहाराजांनीं वेदश्रुतीबद्दल अत्यंत आदराचे उद्गार काढले आहेत ते या ग्रंथांत पाहण्यास सांपडतात.

तुझींय वाचेचिय बोसंगळा । वेदश्रुति तिष्ठति स्वलीळा ॥ ७ ॥

सूत्र : पृथ्वीराग्निश्चऋग्वेदो । यावरील ओवी : अकार प्रणवा पासाव । पृथ्वी आप तेज सावाव । ऋग्वेद उद्भव । निर्माण जाला ॥ २७ ॥

सूत्र : पवनाकाश यजुर्वेदो । टीका : उकार प्रणवापासून । जाला अंतरिक्ष पवन । यजुर्वेद निर्माण । जन्म तेथुनि ॥ २९ ॥

सूत्र : देवसूर्य सामवेदो । टीका : मकार प्रणवा आंतु । देवसूर्यउद्दितु । सामवेद --तज्जनितु । तो प्रसवला ॥ ३१ ॥

आतां यक अखंड नित्य । अंतर्बाह्य व्याप्त ।
परि अविकारी संगरहित । बारे, श्रुतिसार ॥ ३७२ ॥

इत्यादि उद्गारांवरून वेदश्रुतीबद्दल त्यांचा अत्यंत आदर होता व ग्रंथांतील विवेचनावरूनही हें लक्षांत येतें. यावरून अवैदिक व वैदिक हे भेद कृत्रिम, मनुष्यकृत आहेत व तेच हाताशीं धरून व्यर्थ द्वेष, मत्सर वाढविणें हें लक्षण चांगलें नाहीं. संतांनीं अपूर्व संघटण केलें आहे. तिकडे दृष्टि देऊन सर्व समाज व पंथ हे वागले तर अनेक पंथीयांचे द्वेष अल्पही न राहतां हे पंथ एकाच परमात्मरूप वृक्षाच्या अनेक शाखा आहेत हें मनांत बाणेल व समाजांत स्वास्थ्य निर्माण होईल. महाराष्ट्रांतील उदाहरणें देऊन हें विधान स्पष्ट करतों.

पंढरपूरचा भागवत अथवा वारकरी सांप्रदाय मोठा आहे. वारकऱ्यांत निम्मे वारकरी वासकरांचे फडांतील आहेत. म्हणजे निम्मे वारकरी वासकरांचे अनुयायी आहेत. वासकर हे लिंगायत आहेत. लिंगायत शिवोपासक असूनही भागवत धर्माचीं उच्च तत्त्वें पटतांच विठ्ठलरूपी विष्णूचे उपासक झाले. विठोबारायानें मस्तकावर शंकरास धारण केलें आहे, ही शिवविष्णूची एकात्मकता पंढरीस जशी आहे तशीच शिंगणापुरासही शिवाचे शाळुंकेवर दोन लिंगें आहेत. एकास बेल व दुसऱ्यास तुळशी वाहतात. हीही अभिन्न स्थिति आहे. ज्याची उपासना करावयाची तो देव हरिहरात्मक आहे. तर मग उपासकांनीं शैव, वैष्णव, वैदिक,

अवैदिक असे वाद व्यर्थ उत्पन्न करणें बरें नाहीं. दुसरें एक उदाहरण असें:—

श्रीक्षेत्र निंबरगी येथें होऊन गेलेले संत श्रीमत् सद्‌गुरू श्रीनारायणराव भाऊसाहेबमहाराज (श्रीगुरुलिंग जंगमस्वामी) या लिंगायत संतांचे सांप्रदायिक शिष्यांत फार थोर मंडळी आहेत. हल्लीं हा सांप्रदाय चिमड नांवानें ओळखला जातो. त्यांत श्रीरामचंद्रराव यरगट्टीकर चिमड व त्यांचे शिष्य सांगलीचे सुप्रसिद्ध हणमंतरावजी कोटणीसमहाराज हे होत. हल्ली या सांप्रदायांत प्रा. रामभाऊ रानडे, एम.ए., व्हा. चॅन्सेलर, अलाहाबाद युनिव्हर्सिटी, श्री. साधुदास मुजुमदार, सांगली, श्रीसंत बाबुराव कोटणीस, कैवल्यधाम, सांगली, अशी मंडळी आहेत.

श्रीशांतलिंगांचें चरित्र व कृति पाहून शैववैष्णवांनीं बोध घेतला तर पंथांपंथांतील मत्सर दिसणार नाहीं. सर्वच पंथ एका परमात्म्याचे आहेत हा बोध ठसून समाजांत स्थैर्य आल्यावांचून राहणार नाहीं. उपसकांनीं 'शैववैष्णव, वैदिकअवैदिक असे वाद व्यर्थ उत्पन्न करणें हें बरें नाहीं.

श्रीशांतेश्वरमहाराजांची उच्चतर भूमिका पाहून ते श्रीज्ञानेश्वरमहाराजादि भागवत परंपरेंतील मुरलेले संत आहेत हा निश्चय होतो. ग्रंथांतील गुरुस्तवनाच्या ओंव्या पाहतां मी म्हणतों याची साक्ष पटेल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणेंच बद्ध-मुक्त, जीव-शीव, ज्ञान-अज्ञान, माया-ब्रह्म, बंध–मोक्ष यांच्या पलीकडे ते होते. ज्ञानाच्याही पलीकडे श्रीगुरुस्वरूप आहे व तें प्रेमरूप आहे हा त्यांचा उच्चत्तरबोध होता हें मीं ग्रंथांत दिलेल्या टीपांवरून सहजच लक्षांत येईल. या बोधावर असल्यामुळेंच भेददृष्टि नासून हजारों जीवांस त्यांना कृतार्थ करतां आलें. त्यांच्या शिष्यांत ब्राह्मणांपासून सर्वच लोक होते हेंही वर पाहिलेंच आहे. शांतमहाराजांसारखे पूज्य महात्मे वारंवार होतील तर संघटनेचें अपूर्व कार्य सहज होईल.

श्री. नारायणराव वामणगांवकर यांना ग्रंथप्रसिद्धीबद्दल लिहितांच त्यांनीं तावडतोब मान्य केलें. मराठींतील आद्य लिंगायत ग्रंथकार म्हणून त्यांनीं आपल्या वीरशैव संजीवनींत लेखही प्रसिद्ध केला. त्यांच्या साह्यामुळें श्रीकेशवस्वामींच्या वाडांतील हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. श्री. नारायणरावांनीं मनावर घेतलें नसतें तर हा शांतलिंगांचा ग्रंथ कोणत्या कालांत प्रसिद्ध झाला असता हें ईश्वरासच माहीत!

हा ग्रंथ ज्या बाडांत आहे तें बाड भागानगर येथील अंबाजी पुजारी यांचे-कडील आहे. त्यांनीं तें बाड प्रसिद्ध करण्यास लेखी परवानगी दिली आहे. त्याप्रमाणें त्या बाडांतील मुख्य ग्रंथ श्रीकेशवस्वामींची कविता प्रसिद्ध केली. तिचा संपादक मी व प्रकाशक बॅ. श्रीधर वामन नाईक हे आहेत. बॅ. नाईक यांनीं मला त्या बाडांतून कर्णहंस ग्रंथ प्रसिद्ध करण्यास संमति दिली याबद्दल त्यांना मी शतशः धन्यवाद देत आहें.

या ग्रंथास विद्वत्तापूर्ण व लिंगायतपंथाच्या माहितीनें पूर्ण अशी सुंदर प्रस्तावना श्री. नानासाहेब वामणगांवकर यांनीं लिहिल्याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहें. हा ग्रंथ प्रसिद्धीस येण्यास त्यांचें साह्य फार झालें आहे. शारदा-श्रम, यवतमाळ या संस्थेतर्फे माझे स्नेही डॉ. यशवंत खुशाल देशपांडे, एम्.ए., एल्एल् बी., डी. लिट् यांनीं पुरस्कार लिहिल्याबद्दल त्यांचा आभारी आहें. हा ग्रंथ शारदाश्रममालेचें २१ वें पुष्प आहे.

ग्रंथ प्रसिद्ध करण्यास लागणारें द्रव्यसाह्य दानशूर, उदारधी श्रीमंत रावबहादुर दत्तात्रय कृष्ण ऊर्फ बाबासाहेब देशमुख, मु. पारवाजहागीर, यांनीं केलें आहे. त्यांची नुकतीच दिवंगत झालेली आजी ( मोठी माय ) त्यांच्या स्मरणार्थ हें साह्य त्यांनीं केलें आहे. श्री. बाबासाहेबांचा कीर्तिपरिमल सतत वाढत राहो अशी श्रीमातेकडे प्रार्थना करीत आहें.

श्रीशांतलिंगमहाराजांसारखे सर्व पंथांना पूज्य असे महात्मे वारंवार भारतास काय, पण जगतास लाभल्यास जग अत्यंत सुखी होईल. भविष्य काळ अशा संतांच्या आगमनानें सुखमय होवो अशी आशा करून ज्या शिवप्रभूचे कृपेनें ग्रंथ प्रसिद्ध होत आहे त्यांचे चरणीं मस्तक ठेऊन हें हृद्गत पुरें करितों.

मिति श्रीदत्तजयन्ति
शके १८६८
दि. ८।१२।४६

श्री मातृकृपांकित
नरहर सदाशिव जोशी,
खरशीकरशास्त्री

---

टीप—ओवी १४ यांत प्रथमचे ठिकाणीं प्रमथ वाचावें. प्रमथ म्हणजे भक्तवर्ग. बाडांत असलेल्या लेखनांत आम्ही कांहींच फेरफार केला नाहीं. मूळ लेखाप्रमाणें छापलें आहे.

# प्रस्तावना

## श्रीशांतलिंगस्वामींचा ' कर्णहंस '

आमच्या महाराष्ट्रांत नाना जातींचे व पंथांचे महान् संत होऊन गेलेत. त्यांत लिंगायत अर्थात् वीरशैव पंथांतलि समर्थ असा संत कोणी होऊन गेला कीं नाहीं असा माझे पुढें प्रश्न असे. परंतु कै० ह. भ. प. पांगारकर यांनीं लिहिलेल्या " मराठी वाङ्मयाचा इतिहास " ह्या तिसऱ्या खंडांत " रामदास पंचायतन" वाचीत असतांना जयरामस्वामींचे आजे गुरु म्हणून "श्रीशांतेश्वर ऊर्फ शांतलिंगाप्पा " हे मूळचे जंगम म्हणजे लिंगायत वा वीरशैव समाजांतील मठाधिकारी असे अधिकृत गुरु होत असा उल्लेख आढळला. इतकेंच नव्हे तर " कर्णहस्तकी " एक जंगम मतप्रतिपादक असा मराठी ग्रंथ आहे, असाहि त्यांत उल्लेख आढळला. ह्यामुळें महाराष्ट्राच्या संतवाङ्मयाच्या सांप्रदायांत एका नामवंत लिंगायत संताचा मराठी ग्रंथ आहे एवढा सुगावा लागला. पण हा ग्रंथ आपणांस सांपडणार कसा ? असा प्रश्न असे तो असेच !

मराठी लेखनकलेशिवाय जरी मला व्यवसाय नाहीं तरी ग्रंथसंशोधनाचा हव्यास नाहीं व अभ्यासहि नाहीं. इतकें कशाला, कै. पांगारकर हे मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याचा उद्योग करीत असतांना एकदां समक्ष व अनेकदां पत्रद्वारें मला म्हणाले कीं, कर्नाटकांत लिंगायत वाङ्मय प्रसिद्ध आहे; तेव्हां त्या वाङ्मयाचे मराठी वाङ्मयावर काय परिणाम झाले असा एक निबंध मला लिहून पाठीव. मला कानडी येत नव्हतें व नाहीं. कानडी वाङ्मयांतील कांहीं तज्ज्ञ माझ्या परिचयाचे होते व आहेत. त्यांच्याशीं प्रसंगीं चर्चा करून कानडींतील लिंगायत संतांच्या वाङ्मयाचा व मराठींतील वारकरी व भागवत धर्मीय संतवाङ्मयाचा ओघ तत्त्वदृष्ट्या सारखा आहे एवढी मात्र माझी खात्री झाली होती. पण तसा एक संगतवार निबंध लिहून पाठवावा असा उद्योग मात्र माझेकडून झाला नाहीं. कारण अशा उद्योगाला एक प्रकारचें आसनस्थैर्य, मानसिकस्थैर्य व चिकाटीचा व्यासंग लागतो. पण माझें ठिकाणीं ह्यांचा अभाव असल्यामुळें तसा निबंध लिहिण्याचें धाडस मीं केलें नाहीं.

तथापि शांतलिंगमहाराजांचा ग्रंथ सांपडावा ही इच्छा तीव्र. पुढें "केशवस्वामींचें बाड" श्री. नरहरशास्त्री खरशीकर ह्यांनीं प्रसिद्ध केलें व त्यांत शांतलिंगस्वामींच्या ग्रंथाचें बाडहि माझेजवळ आहे असा त्यांच्या प्रस्तावनेंत उल्लेख आला व तो मीं वाचला. खरशीकरशास्त्री मला येऊन भेटले व तो ग्रंथ प्रसिद्ध व्हावा असें म्हणूं लागले. युद्धकाळांतील हा योग असल्यामुळें हा लहानसा ग्रंथ प्रसिद्ध व्हावयास तीन वर्षें लागलीं. पण हा ग्रंथ आज प्रसिद्ध होत आहे व तो आम्हां लिंगायतांतील एका नामवंत देशमुखांच्या आश्रयानें प्रसिद्ध होण्याचा योग आला हें तर ह्यांत विशेषच आहे. मराठींतील पहिला लिंगायत ग्रंथकार व पहिला महाराष्ट्रीय लिंगायत संत म्हणून शांतलिंगस्वामीसंबंधानें स्वजातिसांप्रदायाच्या आभिमानाच्या दृष्टीनें मला विशेषच आपलेपणा वाटतो.

मी स्वतः गृहस्थाश्रमी जंगम कुळांतील. शांतलिंगस्वामी हे गुरुपदाचे अधिकारी झालेले जंगम. त्यांचा काळ हा शिवछत्रपतींच्या आजोबांचा काळ. अर्थात् मराठींतील नाथ संतांचा काळ. ह्या काळीं शिंगणापूरला जंगम मठ होता. तेथें शांतिलिंगस्वामी मठाधिपति म्हणून वास्तव्य करीत होते. त्यांच्या शिष्यगणांत ब्राह्मण व लिंगायत वा लिंगायत व लिंगायतेतर असा भेद नव्हता. जयरामस्वामींचे गुरु कृष्णाप्पा हे ब्राह्मण असूनहि त्यांच्यावर शांतलिंगांची कृपा झाली. शिंगणापूरच्या महादेवाचें दर्शन म्हणजे जोड शिवलिंगाचें दर्शन. एका शिवलिंगावर बिल्वपत्र वाहिलें जातें, तर दुसऱ्या शिवलिंगावर तुळशीपत्र वाहिलें जातें. हरिहराच्या भेटीचें व ह्या उभय देवतांतील अभेददृष्टीचें हें अद्वितीय असें प्रतीक! 'वीरशैव' व 'वीरवैष्णव' यांत देवतांचा नामभेद आहे. पण वैष्णव विष्णुरूपांत रंगला, तर वीरशैव शिवजीवरूपानें नटला. अशा अवस्थेंत साम्याचाच आनंदरंग उठावयाचा. महाराष्ट्रांतील वैष्णव संतांनीं जात मानली नाहीं. कर्नाटकांत प्रसिद्धीला आलेल्या वीरशैवांनीं व त्यांतील लिंगायत संतांनीं म्हणजे शरणांनीं व प्रमथांनींहि जात मानली नाहीं.

तुकारामांचे विरोधक पण नंतर तुकारामांस शरण गेलेले रामेश्वरभट म्हणतात कीं, "उच्च नीच वर्ण न म्हणावा कुणी। जे कां नारायणीं प्रिय झाले। चहूं वर्णांसी हा असे अधिकार। करितां नमस्कार दोष नाहीं।" महाराष्ट्रांतील ज्ञानेश्वर—एकनाथ सांप्रदायाची ही परिणति आहे. पण तत्पूर्वी कर्नाटकांत बाराव्या शतकांत. म्हणजे महाराष्ट्रांत भागवत सांप्रदायाचा उदय

होण्यापूर्वी शांतलिंगस्वामींचे स्फूर्तिदाते ह्यांनीं तरी कोणता संदेश दिला ? शांतलिंगस्वामी म्हणतात, " मग सांता विज्ञप्ति करी । जी बसवादि प्रमथनाभ्यंतरीं । चेनबसवेश्वर गर्भांतरीं । बोलिला कर्णहंस की " ॥ १४ ॥ ह्याप्रमाणें बसव व चन्नबसवेश्वर यांच्या अंतःकरणांत ज्या कर्णहंसकी ग्रंथाची प्रेरणा होती तीच मी सांगत आहें. असें शांतलिंग ग्रंथारंभींच स्पष्ट करतात.

तेव्हां बाराव्या शतकांत कर्नाटकांत ज्या लिंगायत संतांचा वा शरणांचा सांप्रदाय वाढला व ज्यांच्या वाङ्मयानें कानडी वाङ्मय आज प्रभावी गणलें गेलें, ते बसवेश्वर, चन्नबसवेश्वर व प्रभुलिंग ह्यांनीं तरी काय प्रतिपादन केलें ? बसववचनाच्या 'भक्तिस्थळा' च्या २५ व्या वचनांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, " ब्राम्हणापासून तों अंत्यजापर्यंत नाना जाती व नाना लोक आहेत. पण शिवाचा जो खरा भक्त, मग तो मांग असो वा ब्राम्हण असो, ते सर्व एक. शिवभक्तिहीन जे, ते ब्राम्हण असोत वा शूद्र असोत, त्याज्यच." भक्तस्थळाच्या ८९ व्या वचनांत तर, गुरुहस्तें इष्टलिंग धारण केल्यावर पूर्वजातीचा जर विसर पडला नाहीं, नुसतें स्मरण झालें तरी तो नरकांत जाईल. इष्टलिंग हाच त्याचा खरा प्राण होय असें प्रतिपादिलें आहे. इतकेंच नव्हे तर शिव वा लिंग असा ईश्वरनामवाचक भेद बाजूला केला तर बसवादि लिंगायत शरणांचीं वचनें आणि भागवत धर्मीय महाराष्ट्रांतील एकनाथ, तुकाराम, जनाबाई, चोखा वगैरेंचे अभंगहि एकाच सुरांत असलेले आढळतील.

परंतु लिंगायत संतांचा व शरणांचा उद्भव कर्नाटकांत बाराव्या शतकांत झाला, तर महाराष्ट्रांतील संत तेराव्या शतकापासून उदयास आले. दैवत भिन्न व भाषा भिन्न असली तरी ईश्वरभक्तीकरितां जन्मजातींचीं बंधनें तोडून नवा समाज जन्माला घालणें हें उभयतांचें कार्य एकच. मात्र एका शांतलिंगासारख्या महान् अधिकारी जंगमानें कृष्णाप्पा हें ब्राम्हणाचें पोर शिष्य करून हरिहरभेद नाहीं ही गोष्ट जशी सिद्ध केली तद्वतच जन्मजात भेदांसहि मातींत घातलें. लिंगायत संत व महाराष्ट्रांतील संत ईश्वराचें स्वरूप जाणण्यांत, त्याच्याशीं एकजीव होण्यांत व त्याच्या भक्तीचा मार्ग पत्करण्यांत तरी एकाच विमानांत बसून प्रवास करीत असल्याचा प्रत्यय चारशें वर्षांपूर्वी शिंगणापूर क्षेत्रांतील जंगम मठांत आला एवढें खरें ! कृष्णाप्पा व शांतलिंग ह्यांचा संबंध कसा आला ? जनार्दनस्वामीसारखे संत शांतलिंगाना कसे भेटले ? शांतलिंगांनीं समाधिकाळीं

कृष्णाप्पास कोणत्या कार्यावर तलावांतून काशीक्षेत्रीं पाठविलें व तें कार्य करून कृष्णाप्पा कसे लागलीच यशस्वी होऊन साधार परत आले इत्यादि चटका लावणारा वृत्तांत शांतलिंगांच्या चरित्रांत श्री.खरशींकरशास्त्री यांनीं लिहिला आहे.

महाराष्ट्रांत महानुभावपंथाची माहिती आहे. पण लिंगायत पंथ वा वीरशैव धर्म काय आहे ह्या विषयीं अजून अज्ञान आहे. बसवेश्वर बाराव्या शतकांत झाले व त्यांनीं इष्टलिंगधारणेलाच महत्त्व देऊन शिवभक्तीचा प्रचार सर्वत्र केला. तथापि तत्पूर्वी वीरशैव वा लिंगायत होते, म्हणजे इष्टलिंगधारक असे आराध्य ब्राम्हण म्हणून तत्पूर्वी कर्नाटकांत व तेलंगणांत वावरत होतेच व आजहि कांहीं आहेत. बसवेश्वर हा मूळचा आराध्यच. परंतु यज्ञोपवीत धारण न करणारा असा निघाला. इष्टलिंगाची तीव्रतर उपासना हेंच आराध्यांचें व्रत असे व तेंच तत्कालीन वीरशैव योगी आचरीत व बसवेश्वरांनीं इष्टलिंगधारणेवरच जोर दिला. पार्थिव शिवपूजन हें एक प्रकारें मूर्तिपूजन होय असें समजून शिव व ब्रह्म एक. ओंकार हें ब्रह्माचें स्वरूप. इष्टलिंगांत शिवरूप ब्रह्माची व त्याच्या ओंकारस्वरूपाची कल्पना आहे. गुरूनें जन्मतांच ही इष्टलिंगधारणा केली पाहिजे. व पुढें जीवशिव एक असलेल्या ज्ञानाचा उपदेश करून शिवरूप होऊन जगावें, शिवरूप होऊन व्यवहार करावा व शिवरूप होऊन देह विसर्जन करावा असा आग्रह. ह्या आग्रहार्थ जन्मजात मानली नाहीं. स्त्री-पुरुष भेद केला नाहीं. ह्याकरितांच सूत्रांत व गोत्रांत आईबाप व आजेपणजे ह्यांना महत्त्व न देतां फक्त गुरूलाच महत्त्व दिलें आहे. गुरु, लिंग, जंगम, रुद्राक्ष, भस्म, पादोदक, तीर्थ व प्रसाद अशा अष्टवर्णास प्राधान्य देऊन शिव-जीव ऐक्याच्या सहा पायऱ्या आक्रमण करण्याकरितां सहा स्थळें सांगितलीं आहेत. अशा प्रकारें शुद्ध शिवयोग्यांचा सांप्रदाय उभा केला. कल्याणनगरींत बसवेश्वरानें " अनुभव मंटप " म्हणजे ज्ञानपीठ उभारून हजारों शिवयोगी तयार केले असा उल्लेख आहे.

ह्या शिवयोग्यांत ब्राह्मण, जैन, मराठे, राजे, क्षत्रिय, वैश्य वगैरे जातींपासून तों चांभार, महार वगैरे जातींपर्यंत अनेक जातींचे महान् शरण झाले आहेत. चोखा, गोरा, जना, एकनाथ, तुकाराम, नामा वगैरे महाराष्ट्रीय संतांचाच समुदाय बाराव्या शतकांत बसवेश्वरानें जमविला कीं काय असें वाटतें. शिंगणापूरचे शिवयोगी शांतलिंग हे त्यांचाच संदेश देण्याकरितां महाराष्ट्रांत अवतरले व त्यांनीं बसावादिकांचाच संदेश मराठींतून ' कर्णहंस ' ग्रंथांत दिला असें

वाटतें. शांतलिंगास आप्पा म्हटलें आहे. सातारा जिल्ह्यांत जंगमास तसेंच लिंगायत भक्तासहि आप्पाच म्हणतात. परंतु शांतलिंगस्वामी हे जंगमकुलोत्पन्न होते व त्यांना शिंगणापूरच्या मठांत पट्टाभिषेकहि झाला असावा असें वाटतें. शांतलिंगानें ' नीलकंठ ' म्हणून आपल्या गुरूची कृपा प्रथमच भाकली आहे. ' जय जयाजी नीळकंठा । आचार्या अत्युत्कृष्टा ' ह्याप्रमाणें नीळकंठ आचार्योचें असें हें स्तवन आहे. ब्रह्मसूत्रावर क्रियासारनामक भाष्य नीळकंठ शिवाचार्य ह्यांनीं लिहिलेलें प्रसिद्ध आहे. ( कै. वारद ग्रंथमालेंत ह्या ग्रंथाचा कांहीं भाग प्रसिद्ध झाला आहे. ) ह्याचे गुरु व वडील यांचें नांव मल्लयदेव असून आईचें नांव चन्नमांबा असें ग्रंथकारांनीं आरंभींच निवेदन केलें आहे. पण गांव कोणतें व शतक कोणतें एवढा बोध होत नाहीं.

तथापि शिवशक्ति ही पंचमुखी अर्थात् पंचानन स्वरूपाची आहे असें वर्णन नीळकंठांनींहि आरंभीं केलें आहे व शांतलिंगानेंहि पंचमुखी सृष्टीपासूनच सृष्टीचें मूळ व अंत शोधला आहे. शांतलिंगांना संस्कृत येत होतें. नीलकंठ तर आचार्य-पदाचे अधिकारीच होते. शिवाय ब्रह्मजिज्ञासेला ' लिंगं ज्ञातव्यं ' असें नीळकंठ म्हणतात आणि ओंकार व ब्रह्मणं ह्यांच्या वर्णनांकडे वळतात. तशीच सुरुवात शांतलिंगाच्या ग्रंथांत असलेली आढळते. नीळकंठ हे प्रत्यक्ष गुरु नसले तर ज्ञान-दाते गुरु म्हणून शांतलिंगस्वामींना आधारभूत वाटत असावेत. परमेश्वराचीं पांच-मुखें, पांच आचार्य व पांच कळस वीरशैवप्रमुख मानले आहेत. शांतलिंग-स्वामींची गुरुपरंपरा सांगणारा जयरामस्वामीकृत एक आधार खरशीकरशास्त्री ह्यांनीं आपल्या शांत-चरित्रांत दिला आहे. ह्यांत ' प्रभु पंचमहापुरुष सिद्ध ' व ' पंचकलशपूजा अपूर्व ' असा स्पष्ट उल्लेख असून पुढें रेवणसिद्ध, मराळसिद्ध, एकोराम व पंडिताराध्य अशीं वीरशैव आचार्योचीं नांवें दिलीं आहेत. कोल्लिप-कीला रेवणाराध्य, वटक्षेत्र उज्जयनीला मरुळाराध्य, केदारक्षेत्रीं एकोरामाध्याय, श्रीशैलक्षेत्रीं पंडिताराध्य व काशीक्षेत्रीं विश्वाराध्य अशी वीरशैव आचार्योची मूळ परंपरा आहे. शांतलिंगस्वामीचा शिंगणापूर येथील जंगम मठ हा मरुळाराध्य पर-परेंतील उज्जयनी मठाच्या शाखेंतील मठ आहे व ह्या मठांतील शांतलिंग हे पन्नासावे असा बोध 'दशरथ शांत पन्नास हे ' ह्यावरून होतो. अर्थात् शांतलिंग हे शिंगणापूर जंगम मठांतील " पट्टदेवरू " अर्थात् पट्टाधिकारी असे आजन्म ब्रह्मचारी जंगम दिसतात. अशा मठांचे कारभारी गृहस्थ जंगम असले तरी त्यांना आईबापांपेक्षां गुरुपरंपरेच्या नांवावर दीक्षाविधीमुळें मठाधिपतींचा मान लाभतो.

त्यामुळेंच शांतलिंगस्वामींचे आईबापांचा कोठें उल्लेख नाहीं. पुढें ते महान् तपस्वी असल्याचा प्रत्यय आल्यामुळें तलावाकाठीं एका शिंपल्यांत तेथील जंगमास सांपडले अशी आख्यायिका वसविली गेली असावी.

ईश्वरांचें स्वरूप सृष्टींत कसें आहे ? देह व त्याचीं इंद्रियें ह्याला काय काय कारण आहे हें सांगून ओंकाररूप शिवयोग समाधीचें आनंदस्वरूप " कर्ण-हंस " ग्रंथांत वर्णन केलें आहे. उपभोगलेल्या वा मिळालेल्या समाधिसुखाची अधिकृत माहिती स्पष्ट भाषेंत सुगम तऱ्हेनें दिलेली आहे आणि " जय जय निर्गुण, गुणात्मने । अमूर्तमूर्ति चिद्घने । सत्तामात्र ब्रह्मणे । सद्गुरू देवा ॥ " ह्या रूपीं तल्लीन होऊन आनंदरूपानें दिली आहे. त्यायोगें काय होईल, तर शांता म्हणतात कीं, " ऐकत्या पढत्या जना स्वयं होय प्राज्ञा ॥ विघ्न निरसोनिया मना । शांति हाता वसे । चन्न वसवेश्वरोक्ति । मियां बोलिलों अनुभूति । प्रीति पावो विद्यापारंगती । म्हणे सांता नीळकंठु ॥ " तेव्हां महाराष्ट्रांतील वीरशैव बंधूंना वा लिंगायत बंधूंना आपलें धर्मरहस्य गेल्या पन्नास वर्षांतच मराठींतून ( म्हणजे कै० अप्पासाहेब वारद ह्यांनीं जी वीरशैवग्रंथमाला प्रसिद्ध केली ती वाचून ) बोललें गेलें नाहीं; तर चारशें वर्षांपूर्वींच एक महान् तपस्वी जंगम मठाधिकारी स्वामी स्वयंफूर्तीनें बोलला आहे. आमचे मराठी वीरशैव बंधू, विद्यापारंगत असतील तर शांताच्या अनुभूतिवर त्यांची प्रीति जडेल व तेहि शिवभक्तीचें खरें ज्ञान प्राप्त करून घेतील अशी मला आशा आहे.

ह्याकरितां श्री. नरहरशास्त्री खरशीकर ह्यांनीं हें वाङ मिळविलें व तें प्रसिद्ध करण्याचा योग आणून दिला म्हणून मला त्यांचे मनःपूर्वक स्वतःतर्फे व लिंगायत बंधूंतर्फे अभिनंदन करावेंसें वाटतें. याचप्रमाणें मुक्काम पारवा, ता. केळापूर, जिल्हा यवतमाळ ( वऱ्हाड ) येथील सुप्रसिद्ध लिंगायत जहागिरदार श्रीमंत रा. ब. दत्तात्रय कृष्ण ऊर्फ बाबासाहेब देशमुख, जहागिरदार, यांनीं ग्रंथप्रकाशनास अत्यंत उदारपणानें साहाय्य केलें, ह्याबद्दल त्यांचेंहि मी अभिनंदन करतों आणि शांताचरणीं विनम्र होऊन वाचकांची रजा घेतों. तथापि सोलापूरचे रावबहादूर कै० आप्पासाहेब वारद हयात असतांना त्यांच्याच वीर-शैव ग्रंथमालेंत हाहि ग्रंथ प्रसिद्ध होण्याचा योग आला असता तर आनंदाला पारावार उरला नसता. पण तसें घडलें नाहीं हा योगहि विलक्षणच. अस्तु.

उदय कार्यालय,
उमरावती, ता. २५।८।४६

ना. रा. वामणगांवकर

# शारदाश्रमातर्फे पुरस्कार

( डॉ. यशवंत खुशाल देशपांडे, एम्. ए., एल्एल्. बी., डी. लिट्. )

शारदाश्रममालेचें एकविसावें पुष्प म्हणून श्रीशांतलिंगाप्पारचित कर्णहंस या ग्रंथाला शारदाश्रमातर्फे पुरस्कार लिहावयास समाधान वाटत आहे. शारदाश्रम ही संस्था केवळ महानुभव वाङ्मयाचें संशोधन-प्रकाशन करीत नसून या संस्थेतर्फे सर्व प्रकारच्या वाङ्मयाचें संशोधन होतें, हें ' विष्णुदासांची कविता ' " वऱ्हाडी लोकगीतें " इत्यादि प्रकाशित ग्रंथांवरून दिसून येईल. प्रस्तुत कर्णहंस ग्रंथ लिंगायत पंथप्रवर्तक श्रीबसवेश्वर यांचे भाचे आणि पंथाचे एक श्रेष्ठ आचार्य यांनीं केलेल्या सदतीस संस्कृत श्लोकांच्या एका अध्यात्म ग्रंथावर श्रीशांतलिंगाप्पा या थोर विभूतीनें मराठी भाषेंत केलेली ओवीबद्ध टीका होय. भागवतधर्मीय संत-समूहांत त्यांचा केवढा दर्जा होता, हें श्रीशांतलिंगाप्पा हे कृष्णाप्पा यांचे गुरु आणि जयरायस्वामी वडगांवकर यांचे आजेगुरु होत, एवढें सांगितलें म्हणजे कळून येईल. वैदिक अध्यात्म आणि चन्नबसवेश्वरांनीं प्रवर्तित केलेला अध्यात्म याचा श्रीशांतलिंगाप्पांनीं कसा समन्वय घातला हें या छोट्याशा ग्रंथावरून दिसून येईल. संपादकास या ग्रंथाची एकच हस्तलिखित प्रत मिळाली, तीमध्यें मूळ संस्कृत श्लोक दिले आहेत ते अत्यंत अशुद्ध आहेत, याची त्यांना जाणीव होती. पण ती अशुद्धता नक्कल करावी कीं मुळांतच चन्नबसवेश्वरांचें लेखनच अशुद्ध होतें हें ओळखावयास कांहींच आधार नाहीं. श्री चन्नबसवेश्वरांच्या लेखणींतून अशुद्ध श्लोक अवतरले असतील हें संभवत नाहीं. म्हणून लेखकांच्याच संस्कृतानभिज्ञतेचा तो परिणाम असेल, असें मानणेंच योग्य वाटतें. संस्कृतज्ञ वाचकांची गैरसोय होऊं नये. म्हणून संस्कृत श्लोक शुद्ध करून ग्रंथाच्या आरंभीं घातले आहेत. शुद्धीकरण श्री. वि. कृ. पेशवे, एम्. ए., एल्एल्. बी., यवतमाळ, यांनीं आमच्या विनंतीवरून केलें आहे. श्री. पेशवे संस्कृत व्याकरणाचे एम्. ए.असल्यामुळें त्यांच्याचकडून हें शुद्धीकरण करविलें आहे. प्रस्तुत कर्णहंस ग्रंथ लिंगायतपंथीयांनाच आदरणीय होईल असें नव्हे, तर मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांकडूनही या ग्रंथाचा आदर होईल असा विश्वास आहे.

शारदाश्रम, यवतमाळ,
आश्विन शु॥ प्रतिपदा, शके १८६८
ता. २६-९-४६.

आपला,
यशवंत खुशाल देशपांडे
अध्यक्ष, शारदाश्रम, यवतमाळ.

॥ श्रीमातृभ्योनमः ॥

# श्रीसंत शांतेश्वरमहाराज ऊर्फ शांतलिंगप्पाकृत

# कर्णहंस

श्रीगुरुसर्वात्मनेनमः ॥ जयजयाजी नीळकंठा । आचार्या अत्युत्कृष्टा ।
दयाबुद्धिनिधी, स्वधार्मिष्ठा । सद्गुरुराया ॥ १ ॥
तूं भवाग्नी निवविता जलधरू । कीं अज्ञान-तम फेडितां दिनकरू ।
सौंसारसमुद्रीं तारितां ईश्वरु । ब्रह्मांडनायका ॥ २ ॥
तूं विद्यां ऽ विद्या त्रासकु । तत्वभ्रम विध्वंसकु ।
प्रेमपददायकु । ऐसीं ब्रीदें तुझीं ॥ ३ ॥
तूं मोक्षापेक्षियां निज दीक्षिकु । बंध-मुक्ती विच्छेदकु ।
सजीवन्मुक्ति संप्रदायिकु । बाहे उभारूनी ॥ ४ ॥

---

१ ग्रंथकर्ते शांतप्पास्वामी यांचे गुरु. २ विद्या व अविद्या यांचे पलीकडे श्रीगुरुचें स्वरूप आहे. ३ बंध मोक्षाचेही अतीत तूं श्रीगुरु आहेस. ' बद्धोमुक्त इति व्याख्या गुण तो मे न वस्तुतः ॥ भागवत ॥ ' बंधमुक्त अवस्था । माझें स्वरूपीं नाहीं तत्वता । हे गुणकर्त्यांची वार्ता । संबंधु तत्वतां मज नाहीं. ॥ श्रीएकनाथमहाराज ॥ मुक्त कासया ह्मणावें बंधनचि नाहीं ठावें ॥ तुकाराम ॥ ' सर्वं खल्विदंब्रह्म ' ' नेह नानास्ति किंचन ' सर्वच ब्रह्मरूप आहे. अनेकत्व ही एका स्वरूपावर आहे, असें असतां व्यर्थ खोट्या कल्पनेचे तरंग उठवून मी बद्ध आहे तो मुक्त झालों पाहिजे, या कल्पनेनें मोक्षाची किंमत वाढली. पण श्रीशांतप्पा महाराज म्हणतात, गुरुकृपेनें सत्य लक्षांत आलें म्हणजे बंध, मोक्ष दोन्ही कवे नाहींत हें लक्षांत येतें. आनंदघन परमात्मा अव्यक्त आहे. त्याचें व्यक्त स्वरूप जर जग आहे तर तेथें बंध, मुक्त ही भाषा असूं शकत नाहीं. श्रीशांतप्पा महाराजांचा बोध भागवत सांप्रदायी संताप्रमाणें व उपनिषदाच्या सिद्धांताप्रमाणें आहे. या उच्च बोधावरून स्वामी अधिकारसंपन्न महात्मे होते हें सहज लक्षांत येतें. ४ बाह्या उभारून.

सृजी-स्थिति-संहारु । तिळोधान[1] अनुग्रहो व्यापारु ।
करावया समर्थ तूं ईश्वरू । ह्मणवुनि स्वामी ॥ ५ ॥
जो निःशब्द निर्गुण सांचे[2] । तो बोल तुझीय वाचे ।
तुझीय निद्रेमाजीं समाधींचें । विश्राम-धाम ॥ ६ ॥
तुझीय वाचेचिय वोसंगळा[3] । वेद-श्रुति तिष्ठती स्वलीळा ।
मुक्ती पुरविती दिव्य भोगसोहळा । दार्शत्वपणें[4] ॥ ७ ॥
तुझीय स्वासोस्वासा अंतरीं । आनंदें केलें विश्राममंदिरीं ।
होउनि सेवक अष्टोप्रहरीं । वोळगत असे[5] ॥ ८ ॥
तुझीय निमिष्योनिमिष्यांत वस्ती । निजसुखें केली विश्रांती ।
ज्ञानें ज्ञानपणा मुकोनि आलें शांती । तुर्झाय सवें[6] ॥ ९ ॥
तुझीय स्फूर्तीचा संमती । विवेक-विचारा जाहली समाप्ती ।
समता-क्षमा-दया-शांती । हृद्भुवनीं विसावली ॥ १० ॥
आतां असो तूं सच्चिदानंद प्रभु । अखंडदंडायमान स्वयंभु ।
व्योममूर्ति अविलंबविभु । पूर्ण चैतन्य तूं ॥ ११ ॥
जयजय निर्गुण, गुणात्मने । अमूर्तमूर्ति चिद्घने ।
सत्तामात्र ब्रह्मणे । सद्गुरुदेवा ॥ १२ ॥
स्तवन ऐकोनि श्रवणीं । बोले कैवल्यदानी ।
कवण अवस्था अंतःकरणीं । शिष्यश्रृंगा ॥ १३ ॥

---

१ तिरोधान (?) २ सत्य. ३ वाचेच्या अंकावर म्हणजे वाचेच्या आंत. ४ श्रीगुरूचे ठिकाणीं मुक्ति-मोक्षही दास्य करतात. ५ 'आनन्दादेव खल्विमानि भूतानि जायन्ते,' 'आनन्देन जातानि जीवन्ति,' 'आनन्दे प्रयन्त्यभिसंविशन्ति' या श्रुति वचनाप्रमाणें सर्वच आनंदमय आहे. प्रभूचे-गुरुचे श्वासोश्वासही आनंदमय आहेत. इतकेंच काय पण श्रीशांतप्पांचा स्वानुभव असा उच्चतर आहे कीं, श्रीगुरो, तुमचे श्वासांतही आनंद दास्य करीत आहे. सारांश तुम्ही अखंड आनंदमय आहांत हा उच्चतर बोध शांतप्पांचा आहे. ६ ही ओवी तर उच्च स्वानुभवास्थितीची आहे. अज्ञान ज्ञानानें नेलें. तें ज्ञानही ज्ञानपणानें उरलें नाहीं. तें ज्ञानही प्रभूरूपांत शांत झालें. आतां अज्ञान-ज्ञान हे शब्द मात्र आहेत. वस्तुतः ज्ञानअज्ञानाची उपाधी प्रभूरूपास नसून तो आनंद मात्रच आहे. हा उच्च भाव स्वामींचा फार श्रेष्ठपणा दर्शवीत आहे.

मग सांतो विज्ञप्ति करी । जी वस्त्रादि प्रथम नाभ्यांतरी ।
चेन वश्वेश्वरे गर्भांतरीं । बोलिला कर्ण हंसकी ॥ १४ ॥
तें सांगिजेल जी यथाविध । महाराष्ट्र-भाषाविशद ।
मग कीजे अनुभवसिद्ध । गुरूमूर्ती ॥ १५ ॥
ऐकोनि बोले करुणासिंधु । होय निश्चळ सावधु ।
बोलिजेल यथाविधु । तें धरी अंतःकरणीं ॥ १६ ॥
निजब्रह्मीं उद्भवला ॐकारु । तो अवतरला ब्रह्मांड तरु ।
मुळशाखा-पत्र-फळसंभारु । विस्तारला जो ॥ १७ ॥
ॐकार मुळ प्रणवा आंतु । अकार-उकार-मकार उद्दीतु ।
तियें वजाक्षरें तज्जनीतु । विस्तारलीं ॥ १८ ॥
अकार तोचि नाद । उकार म्हणिजे विंदे[२] ।
मकार तो प्रसिद्ध । कलारूप ॥ १९ ॥
अकार अक्षर ते जागृती । उकार ते स्वप्नस्थिति ।
मकार म्हाणिजे सुषुप्ती । निर्धारें पैं ॥ २० ॥
अकार तोचि रुद्र । उकार म्हणिजे ईश्वर ।
मकार तोचि निर्धार । सदाशिवो ॥ २१ ॥
अकार ह्मणिजे सबळ । उकार शुद्ध प्रबळ ।
मकार तो केवळ । सर्वथैत्र ॥ २२ ॥
अकार ह्मणिजे कायिक । उकार तोचि माईक ।
मकार ह्मणिजे मुख्य । प्रणवरूप ॥ २३ ॥
यैवं[३] अकार उकार मकारु । तयासि नादबिंद-कळा आधारु ।
नाद विंद-कळेसी निरंतरु । आधारुप्रकृती ॥ २४ ॥
प्रकृति ते आधारु प्रणव । प्रणवाते लिंग स्वयमेव ।
लिंगाते निरावेव । वस्तु आधार ॥ २५ ॥
अ ह्मणिजे अनूहत । उ नादाकार उरला तेथ ।
म विंदुरूपें जाला मिश्रीत । येवं शिव-शक्तियोगें ॐकारु जाला॥२६॥

---

१ ग्रंथकार शांतप्पास्वामी. २ विंदु. ३ एवं बाडांत यवं शब्द आहे तेथें एवं वाचावें.

सूत्र : पृथ्विराग्निश्च ऋग्वेदो, भवति ॐ रुद्रदेवता ।
अकारेच लयं प्राप्ति प्रथमं प्रणवंशिके ॥ १ ॥

॥ टीका ॥ अकार प्रणवापासाव । पृथ्वि, आप, तेज, सावेन ।
ऋग्वेद उद्भव । निर्माणजाला ॥ २७ ॥
ॐरुद्रोदेवता । यवं अकारान्त लयंगता ।
हें प्रथम प्रणव औंशुकर्ता । ॐकार मातृका ॥ २८ ॥

सूत्र : पवनाकाश यजुर्वेदो, भवतु ॐ देव ईश्वरः ।
उकारेच लयं प्राप्ति, द्वितीयं प्रणवंशिके ॥ २ ॥

॥ टीका ॥ उकार प्रणवापासून । जाला अंतरिक्ष पवन ।
यजुर्वेदनिर्माण । जन्म तेथुनी ॥ २९ ॥
ॐ देवता ईश्वर । यवं उकारांत लय संव्हार ।
द्वितीय प्रणवंशिक विस्तार । मात्रा ॐकाराची ॥ ३० ॥

सूत्र : देव-सूर्य सामवेदो, ॐ सदाशिव देवता ।
मकारेच लयं प्राप्ति, तृतीयं प्रणवंशिके ॥ ३ ॥

॥ टीका ॥ मकार प्रणवा आंतु । देव, सूर्य उद्दीतु ।
सामवेद तज्जनितु । ता प्रसवला ॥ ३१ ॥
ॐ देवता सदाशिव । यवं मकारान्त पराभव ।
तृतीय प्रणवंशिक सावेव । मात्रा ॐकाराची ॥ ३२ ॥

श्लोक : अकारेच उकारेच, मकारेच तृतीयकं ॥
इदमेकं समुत्पन्नं, ॐ मिति ज्योति रूपकं ॥ ४ ॥

॥ टीका ॥ यवं अकार उकार मकार । तृतीय मात्रा सविस्तार ।
यासी प्रसवला ॐ कार । ज्योतिरूप ॥ ३३ ॥

श्लोक : ॐकार प्रभवा वेदा, ॐकार प्रभवाक्षरः ॥
ॐकार प्रभवात्सर्वं, त्रैलोक्यसचराचरम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ ॐकोर प्रसवली वेदवाणी । क्षराक्षर मांडणी ॥
त्रैलोक्य, सचराचर उभ (ऊ) नि । सकळ ॐकार विस्तार ॥ ३४ ॥

श्लोक : सर्वं व्यापकमोंकारं मंत्रा नेत्रन शोभयेत् ॥
प्रणवयोहि परब्रह्मं, प्रणवं परमंपदम् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ॐकार सर्व व्यापक । तयाविण मंत्र नपुसक ।
ते न शोभति अविवेक । ॐकाराविण ॥ ३५ ॥
प्रणव परब्रह्म निर्वाण । प्रणव परम पदधन ।
ॐकार प्रणव कारण । सकल सृष्टी ॥ ३६ ॥

श्लोक : ॐकार नादरूपंच । ॐकारं मंत्र रूपकं
ॐकारं व्यापितं सर्वं । ॐकारं गोप्य माननं ॥ ७ ॥

॥ टीका ॥ ॐकार नाद स्वरूप । ॐकार मंत्रादिरूप ॥
ॐकार व्यापुनि निर्लेप । अति गोप्यमान ॥ ३७ ॥
यवं ॐकार विप्तत्ति विस्तार । अनंत-ब्रह्मांड चराचर ।
आतां पंचतत्वांचा विचार । उत्पात्ति बोलिजेल ॥ ३८ ॥

श्लोक : सद्योजात स्तथाभूमि वामदेवो द्भवेजलं ॥
अघोरा द्वन्हिरुत्पत्ते, तत्पुरूषवायुरुच्यते ॥ ८ ॥
ईशान गगनाकारं, पंच ब्रह्ममयं जगत् ॥
पंचभूतमिदं सर्वं, शिव वक्त्र समुद्भवं ॥ ९ ॥

॥ टीका ॥ सद्योजात मुख्य धरणी । जळ जन्मलें वामदेवा वदनीं ।
अघोरी उत्पत्ति वन्हीं । जन्म जाला ॥ ३९ ॥
तत्पुरुषी जाला पवन । ईशान वदनीं गगन ।
यवं पंचब्रह्म पंचवदन । पासुनि तत्व उत्पत्ती ॥ ४० ॥
आतां पंचमहाभूतांचें । गुण-धर्म वर्ण साचे ।
आदि दैवत तयाचें । सांगिजैल ॥ ४१ ॥

श्लोक-सूत्र-शब्दादि पंचविषयं, भूमि अंशादि वर्तते ।
चतुर्गणापवर्गंतु, त्रिगुणत्वं तु वन्हिके ॥ १० ॥
वायुश्चाद्विगुणं प्रोक्त, आकाशश्चैक मेवच ।
यत्काठिण्य तथा पृथ्वि, यद्द्रवं जळ मुच्यते ॥ ११ ॥
यदुष्णांच तथा तेजं वायु संचराति त्वह ।
आकाश महदाकाशं, भूत धर्म मिति स्मृतः ॥ १२ ॥
पीत श्वेतंच रक्तंच. हरितं-कृष्णमेवच ।
पृथ्व्यादि पंचभूतानि, वर्णभेद प्रकीर्तीतः ॥ १३ ॥

पृथ्वी ब्रह्मा, जले विष्णु, तथा रुद्र हुताशनं ।
ईश्वरो पवनं देवं, आकाशस्त्र सदाशिवं ॥ १४ ॥
॥ टीका ॥ शब्दादि गुणपंचक । कठीण धर्म-कर्म-धारणादिक ॥
पीत वर्णादि देवता पृथक । ब्रह्मा पृथ्वीसी ॥ ४२ ॥
शब्द-स्पर्श-रूप-रस हे गुण । द्रत्वव धर्म-कर्म पिंडीकरण ।
श्वेतवर्ण आदि देवता कारण । विष्णु जळासी ॥ ४३ ॥
शब्द-स्पर्श-रूप हे गुणत्व । उष्णत्व धर्म कर्म दहकत्व ॥
रक्तवर्ण आदिदैवत । रुद्रतेजीं ॥ ४४ ॥
शब्द स्पर्श हे गुण द्वैत । चळणादि धर्म विहरणादिकर्मकृत ॥
हरित वर्ण आदि दैवत । ईश्वर पवनीं ॥ ४५ ॥
शब्द गुण अवकाश । सछिद्रता धर्म कर्म अवकाश ॥
कृष्णवर्ण आदि दैवत विशेष । सदाशिव गगनी; ॥ ४६ ॥
यवं भूतांचें गुणधर्म विविध । आतां बोलिजेल शिवतनु प्रसिद्ध ॥
जे सकळ गर्भी करूनि अगाध । ब्रह्मांडाकारें ॥ ४७ ॥

श्लोक : भू-जलाग्नि मरु द्योम, भास्करं शशिचेतना ।
दिवा प्रकाशते सूर्य, रात्रौ चंद्र प्रकाशयत् ॥ १५ ॥
सर्वं चैतन्य मात्मानं, शिवं व्याप्यष्ट मूर्तय ॥ १६ ॥
॥ टीका ॥ पृथ्वि आप-तेज-पवन । आकाश चंद्र-सूर्य चेतन ॥
यवं अष्ट अंश कारण । शिवतनु ब्रह्मांड ॥ ४८ ॥
जया गर्भि सुर-नर-पन्नक । तारापंथ अनेक ॥
सप्त द्वीपावती अष्टादिक । जया आंतु ॥ ४९ ॥
सप्त समुद्र, सप्त पर्वत । स्वर्गादि, मेरू विख्यात ।
गण-गंधर्व, अंतरिक्ष समस्त । समोह गर्भी ॥ ५० ॥
अनंत कोटि जीव विस्तार । त्रैलोक्य सकळ चराचर ॥
सर्व गार्भे करूनि निज मंदिर । सर्वदा सर्वतनु ॥ ५१ ॥

श्लोक : पिंड ब्रह्मांड यो रैक्यं, लिंगं सुत्रात्मनो रपिः ।
सुषुप्त्य व्याकृतो रैक्यं क्षेत्रज्ञं परमात्मनि ॥ १७ ॥
॥ टीका ॥ पिंड ब्रह्मांड उभय ऐक्यता । लिंग हिरण्यगर्भ येक रूपता ॥
सुषुप्ति आणि अव्याकृता । ऐक्य सिद्ध ॥ ५२ ॥

परमात्मा जीवात्मा अभिन्न । अद्वय ऐसें बोलति श्रुतिवचन ॥
म्हणउनि पिंडाचें कारण । ब्रह्मांड पै ॥ ५३ ॥
स्थूल महाभुतें ब्रह्मांडीं । तेंची सूक्ष्माकारें पिंडीं ॥
पंच भौतिक देह प्रौढी । कार्यरुपत्वें ॥ ५४ ॥
धरणी-जळ-हुताशन । पवन आणि गगन ॥
आतां याचे अंश गुण । विविध सांगो ॥ ५५ ॥

श्लोक : अस्थि-मांस-त्वचा-नाडी, रोम चैवा तु पंचकं ।
क्षिति पंच गुणा पोक्तं सा अंशं तु प्रकीर्तितः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ आस्थि मांस आणि चर्म । नाडीचक्र तथा रोम ॥
हे गुणपंचक विषम । अंश पृथ्वीचे ॥ ५६ ॥

श्लोक : लाळ मूत्र तथा स्वेद, शुक्र शोणित मेवच ।
आप पंच गुणाश्चैव, सा अशं तु प्रकीर्तितः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ लाळ मूत्र तथा स्वेद । शुक्र शोणित एवं विविध ।
इये पांच गुण प्रसिद्ध । अंश जळाचे ॥ ५७ ॥

श्लोक : क्षुधा-तृष्णा तथा निद्रा, आलस्य संग मेवच ।
अग्निपंचगुणं प्रोक्तं, सा अंशंतु प्रकीर्तितः ॥ २० ॥

॥ टीका ॥ क्षुधा आणि तृष्ण । निद्रा आलस्य मैथुन ।
यवं गुण पंचक भिन्न । अंश तेजाचें ॥ ५८ ॥

श्लोक : धावनं वळनं चैवा–, कोचनंच प्रसारणं ।
निरोधश्चेतु विज्ञेय वायु पंच भिति स्मृतः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ धावन, वळन, अकोचन । प्रसारण वियोगण ।
ईय भिन्न भिन्न भिन्न । पंच गुण वायोचे ॥ ५९ ॥

श्लोक : राग द्वेषं भयं लज्या, मोहश्चैव यथा तथा ।
व्योम पंच गुणा प्रोक्तं सा अंशंतु प्रकीर्तितः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ राग द्वेष तथा भय । हें गुण पंचक निःसंशय ॥
लज्जा–मोह गुण इय । अंश आकाशाचे ॥ ६० ॥
आतां पंच तत्वासि गुण । विविध भेदे असती भिन्न ।
सकळी तें कथन । कीजेल तयाचें ॥ ६१ ॥

पृथ्वीचें गुण पंचवीस । आपासी गुण वीस ।
तेजासि पंचदश । गुण निरुते ॥ ६२ ॥

वायोसी गुण दशक । आकाशासी गुण पंचक ॥
यवं पंच-महा त्रिगुण मुख्य । असाति सूक्ष्माकारे ॥ ६३ ॥

आतां तत्व पंचिकृत विस्तार । करुनि कीजेल कर्दम यकत्र ।
तत्वांश तत्व मेळउनी शरीर । उभारणी जाला ॥ ६४ ॥

यक तत्व कीजे पंचविध । तें पांचाठाई मेळविजे विविध ॥
भुता भूत मिळोनि यकवद । तें पंचीकृत बोलीजे ॥ ६५ ॥

श्लोक : अहंच प्राण वायुश्च, नासिकं गंध मेवच ।
वायु पंचमिदं प्रोक्तं, इत्यैते भूमि पंचकं ॥ २३ ॥
चित्तं अपान वायुश्च, जिव्हा रसन मेवच ।
गुह्य पंचामिदं प्रोक्त इत्यैते जल पंचकं ॥ २४ ॥
बुद्धि उदान वायुश्च, चक्षुरूप स्तथैवच ।
पादादि पंचमिदं प्रोक्तं, इत्यैते रग्नि पंचकं ॥ २५ ॥
मनसो व्यान वायुश्च, चर्मस्पर्शस्ततैवच ।
पाणि पंच मिदं प्रोक्तं, इत्यैते वायु पंचकं ॥ २६ ॥
ज्ञातृ समान वायुश्च, श्रोत्र शब्दस्तथैवच ।
वाकादि पंच मिदं प्रोक्तं, इत्यैते व्योम पंचकं ॥ २७ ॥

॥ टीका ॥ ज्ञातृ-मन-बुद्धि-चित्त-अहंकार । गगन जालें विविधाकार ॥
अंतःकरण रूपें निरंतर । निजांशें ठेलें ॥ ६६ ॥

प्राणापान व्यान- उदान- समान । वायु जाला पंचप्राण ॥
व्यान रूपें आपण । निजांशें ठेलें ॥ ६७ ॥

श्रोत्र-त्वचा-चक्षु-जिव्हा-घ्राण । तेज पंच प्रकारे भिन्न ।
चक्षू रूपें आपण । निजांशे ठेलें ॥ ६८ ॥

शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध । आप विषयत्वें पंचविध ।
रस रूपें प्रसिद्ध । निजांशें ठेलें ॥ ६९ ॥

वाचा-पाणी-पाद-गुह्य-गुद । क्षिति कर्मेंद्रिय पंचविध ॥
पायुरूपें प्रासिद्ध । निजांशें ठेलें ॥ ७० ॥

तत्व अंश मुख्य पांची । निजांशें ठेलें आपणापेंची ॥
येर चारी चारी परस्पर पेंची । विविध तत्वासी मिळाली ॥ ७१ ॥
आकाश वायुसी मन । तेजीं बुद्धि आपण ॥
आपीं चित्त गगन । पृथ्वीसी अहंकारु जाला ॥ ७२ ॥

वायु गगनेसी समान । तेजी मिळालिया उदान ।
अल्प संयोगे आपण । पृथ्वीसी प्राण वायु ॥ ७३ ॥
तेज आकाश योगे श्रोत्र । वायुसी त्वचां सर्वत्र ।
आप संयोगे जिव्हा पवित्र । पृथ्वीसी घ्राण जालें ॥ ७४ ॥

आप आकाशीं शब्दांश । वायुसी जालें स्पर्श ।
तेज संगें रूप विशेष । पृथ्वीसी गंध जालें ॥ ७५ ॥
धरणी वाच्यांश गगनीं । वायुसी जाली पाणी ।
पादांश मिळाला वन्ही । आपीं गुह्य जाली ॥ ७६ ॥

अहंकार प्राणवायु । नासिक गंध पायु ।
हें क्षितिपंचक समुहु । पंच अंशक ॥ ७७ ॥
चित्त आणि अपान । जिव्हा रस तथा शिस्न ॥
हें जळ पंचक कारण । पंच आंशिक ॥ ७८ ॥

बुद्धि उदान प्रसिद्ध । नेत्ररूप तथा पाद ।
हा अग्नि समोह पंचविध । पंच आंशिक ॥ ७९ ॥
मनो व्यान दोन्हीं । त्वचा स्पर्श पाणी ।
हें वायुपंचक मांडणी । पंच आंशिक ॥ ८० ॥

अंतःकरण समान श्रोत्र । शब्द वाचा व्यापार ॥
हा व्योमपंचक विस्तार । पंच अंशक मिळणी ॥ ८१ ॥
आतां ज्ञान इंद्रियांची विवरता । विषय तत्भेद आदिदेवता ॥
स्वकर्म महाभूतां । सांगिजेल ॥ ८२ ॥

श्रोत्र-त्वचा-चक्षु-जिव्हा घ्राण । हें ज्ञानेंद्रियें कारण ।
यांसी कीजे विवरण । आदिदेवता भूतसहित ॥ ८३ ॥

श्लोकः— श्रोत्रत्वं नेत्र जिव्हांश्च । घ्राण पंचेंद्रियास्तथा ।
आकाश-वायु-रग्निश्च । आप पृथ्वी क्रमेणच ॥ २८ ॥

॥ टीका ॥ श्रोत्र इंद्रिय विख्यात । तया आकाश महाभूत ॥
दशदिशा आदि दैवत । शब्द विषय ॥ ८४ ॥
अक्षराणां अक्षरात्मकं । हें उभय शब्द भेद पृथक ॥
यवं संमोह विवेक ! श्रोत्रादि हा ॥ ८५ ॥

त्वचा इंद्रिया लागुन । महाभूत पवन ।
आदि देवता कारण । चंद्र निरुता ॥ ८६ ॥
तया विषय स्पर्शगुण । शीतोष्ण, मृद – कठीण ॥
हे चारी भिन्न भिन्न । स्पर्शभेद ॥ ८७ ॥

नेत्र इंद्रिय जेथ । तया अग्नि महाभूत ॥
सूर्य आदि दैवत । रूप विषय ॥ ८८ ॥
श्वेत–पीत–मंजिष्ट । हरीत रक्त कृष्ण विविध षट् ॥
रूप भेदस दृष्ट । नेत्रांसि पै ॥ ८९ ॥

जिव्हा इंद्रियासी महाभूत । जळाचि पैं विख्यात ॥
वरुण आदिदैवत । रस विषय ॥ ९० ॥
मधुर, आम्ल, तिखट, कटु । कषाय आणि खारट ॥
हे रस भेद षट्। जिव्हेसी पैं ॥ ९१ ॥

घ्राण इंद्रियाचे मेळीं । महाभूत भूतळीं ।
अश्विनौ देवता सर्वकाळीं । विषय सुगंध दुर्गंध ॥ ९२ ॥
आतां कर्मेंद्रियांचा भेद । सांगिजेल विविध ।
वाचा, पाणि, पाद, गुह्य, गुद । कर्मेंद्रियें हीं ॥ ९३ ॥

वाचा इंद्रिय जेथ । नाग वायु सतत ।
सरस्वती आदि दैवत । विषय सुवाक्य दुर्वाक्य ॥ ९४ ॥
पाणि इंद्रियाच्या मेळीं । कूर्म वायु पैं वळी ।
इंद्र आदि दैवत सर्वकाळीं । विषय आदान विदान ॥ ९५ ॥
पाद इंद्रियासी वायो । कृकल पैं सर्वथैवो ।
आदि देवता पद्मोद्भवो । विषय गमना–गमन ॥ ९६ ॥
गुह्य इंद्रियासी युक्त । धनंजय वायु सर्वगत ॥
ब्रह्मा आदिदैवत । आनंद विषय ॥ ९७ ॥

गुद इंद्रिय जेथ । सर्वदा वायु देवदत्त ॥
नैर्ऋति आदि दैवत । विषय विसर्जन ॥ ९८ ॥
आतां दश वायूचें स्थान । धर्म-कर्म-वर्ण ॥
कीजेल विवरण । विविधांपरी ॥ ९९ ॥
प्राण–पान–व्यान–उदान–समान । नाग–कूर्म–कृकल–पवन ॥
देवदत्त. धनंजय यवं भिन्न । दशवायु हे ॥ १०० ॥
प्राणवायु इंद्रनील वर्ण । हृदयस्थानि असोन ॥
श्वासोश्वासीं गमन । रीघ नीघ ॥ १०१ ॥
अन्नातें करूनियां पचन । आपाद मस्तक धरून ॥
पुरवीतसे रस जविन । पिंड प्रमाणें ॥ १०२ ॥
अपान वायु वर्ण हरीत । गुदस्थानीं असणें अखंडित ॥
मळमूत्र विसर्जन करित । हा व्यापार तयाचा ॥ १०३ ॥
अन्नरस व्याप्य करित । अधोद्वारा अकोचित ।
इहीं लक्षणीं वर्तत । अपान वायु ॥ १०४ ॥
उदानवायु तरी प्रभा । तया कंठस्थानीं बैसक शोभा ॥
स्वप्नीं दावी विचित्रे विंवा । आणी शिंक, खोंसी[1] करी ॥ १०५ ॥
छार्दी ( ? ) उत्तीष्ण निरोधन । करी अन्नरसा अरोप्तान ( ? ) ।
इहीं लक्षणीं उदान । वर्तत असे ॥ १०६ ॥
व्यानवायु गोक्षीरवर्ण । सर्वसंधीं असोन चळण–वळण ॥
नाडी चक्रांसी पुरवी अन्न पान । आणि चळवीत असे ॥ १०७ ॥
समान वायु वर्ण निळा । नाभी स्थानीं बैसक लीळा ॥
समस्त नाळीं पसरोनि अन्नकळा । पुरवीत असे ॥ १०८ ॥
नागवायु पीतवर्ण । समस्त रोमावळी असोन ।
करीतसे चळण । सर्वठांयीं ॥ १०९ ॥
कूर्मवायु श्वेतवर्ण पुट । उदर ललाटीं असोनि तनु करी पुष्ट ॥
उन्मीलिन करी नेत्रपाट । मुख अच्छादि उघडी ॥ ११० ॥
कृकल वायु प्रभा आन । नासिकाग्रीं तया आसन ॥
क्षुधाधर्म करी चेतन । आणि गमनागमन ॥ १११ ॥

१ खोकला.

देवदत्त वायु वर्ण.स्फटिक । गुह्यस्थानीं कंठीं तया बैसक ॥
व्यापारू करी अनेक । चेतनादिक ॥ ११२ ॥
आसन–शयन–उठवणें । चेतना उद्धट बोलणें ।
इहीं लक्षणें वर्तणें । देवदत्तासी ॥ ११३ ॥
धनंजय वायु प्रभा माणिक्य । तया ब्रह्मरंध्रिं बैसक ।
कर्ण इंद्रियां दावी कौतुक । समुद्रघोषाचें ॥ ११४ ॥
तया घोषाचा उच्चारू । अंतकाळीं होय संहारु ॥
यवं हा व्यापारु । धनंजयासी ॥ ११५ ॥
आतां उपवायूचें विवरण । वैरंभु मुख्य प्रभंजन ॥
अंतर्यामी महाप्राण । ऐसे उपवायु पांच ॥ ११६ ॥
वैरंभु वायु अंतरंगीं । चेतउनी प्रकृति करी जागी ॥
विषय त्यागुनि वैरागी । श्रद्धा धरी ॥ ११७ ॥
मुख्य वायु बाहत्री[1] सहस्त्र । नाडी चक्रासी आधार ॥
खेलवीतसे निरंतर । नाडी राम ॥ ११८ ॥
प्रभंजन वायो । अष्ठमदां करी क्षयो ॥
अरी षड्वर्ग समोहो । वश्य करी ॥ ११९ ॥
अंतर्यामी वायो तनुत्रयेसी । व्यतिरिक्त देहादि प्रपंचासी ॥
तुर्यस्थानीं अहर्निशी । क्रीडत असे ॥ १२० ॥
महाप्राणवायो सर्व अंतरस्थानीं । असे नाद ब्रह्म होउनी ॥
सोहं अक्षरें दोन्हीं । उच्चारू करी ॥ १२१ ॥
आतां सांगिजेल विसत्ती । करणादि[2] चतुष्टयाची उत्पत्ती ॥
तत् महाभूत आदि देवता स्थिति । बोलिजेल ॥ १२२ ॥
आत्मया आकाशाचें मीळणीं । अंत:करण जन्मलें तत्क्षणीं ॥
जें देह समूह गर्भी करुनी । आपण ठेलें ॥ १२३ ॥
आत्मया वायुसी जाला संगम । तेथ मनासि जाला जन्म ॥
ते देहादि इंद्रियें धर्म । अधिष्ठोनि वर्ते ॥ १२४ ॥
आत्मया तेजाच्या संगती । बुद्धिसी जाली उत्पत्ती ॥
जे करी निश्चय स्थिति । पदार्थीसी ॥ १२५ ॥

१ बहात्तर. २ अंत:करण चतुष्टय.

आत्मया जळाच्या मेळीं । चित्त जाहलें तत्काळीं ॥
जें अनुसंधानात्मक सर्वकाळीं । विषयार्थी ॥ १२६ ॥
आत्मया क्षितीच्या संगमी । जाहला अहंकारु अतिभ्रमी ॥
जो देह मी म्हणे पराक्रमी । कर्ता आपण ॥ १२७ ॥
ज्ञातृस महाभूत गगनु । आदि देवता विष्णु ॥
जे चतुष्टयांसी गर्भी कदकरुनु । वर्ते बीज न्यायें ॥ १२८ ॥
मनासी वायो महाभूत । चंद्रमा आदिदैवत ॥
तें संकल्प-पिकल्पीं अखंडित । वर्तत असे ॥ १२९ ॥
वुद्धिसी महाभूत अग्न । आदि देवता चतुरानन ॥
जे निश्चयरूपें आपण । वर्तत असे ॥ १३० ॥
चित्तासी महाभूत जीवन । आदि देवता नारायण ॥
जें धरूनिया अनुसंधान । वर्तत असे ॥ १३१ ॥
अहंकारासी क्षिती महाभूत । रुद्र आदि दैवत ॥
जे अहंभावे देहममत्व । वर्तत असे ॥ १३२ ॥
भुतपंचक वायुपंचक । करण चतुष्टय इद्रियदशक ॥
यवं चतुर्विंशति तत्वविवेक । देह वोलिजे ॥ १३३ ॥
पंचविंशति तत्व चेतन । जो आत्मा सकळां कारण ॥
तो विदेहीया देह अधिष्ठान । वर्तत असे ॥ १३४ ॥
आतमयाते निरुती । ज्ञानइंद्रिय चित्शक्ती ॥
तयासी आदिदेवता संवित्ती । पर शिव वस्तु ॥ १३५ ॥
जो सर्वत्रांसी बीज । असे पूर्ण चैतन्यीं तेजःपुंज ॥
दीप्त प्रभा स्वयंतेज : अखंडित जें ॥ १३६ ॥
चिदादित्यु सत्तामात्र । तत्वें समस्तांसि अस्फुटतर ॥
सूक्ष्माति सूक्ष्माकार । चाळकपणें ॥ १३७ ॥
अनंत ब्रह्मांडा बाहेभीतरी । ओतपोत सचराचरी ॥
असतूची असे निरंतरी । सदासर्वदा ॥ १३८ ॥
आतां असो हे स्थिति । आत्मयासी पंचस्वरूप शक्ती ॥
तिया अनुक्रमे सांगिजेती । विविधापरी ॥ १३९ ॥

१ पृथ्वीच्या. २ आपतत्व. ३ खरोखर. ४ सर्वांह्यांवर. ५ ओतप्रोत.

मनसादिकरणचष्टया । पराशक्ति बोलिजे त्या ॥
प्राणादि वायोपंचक इया । आदिशक्ति बोलिजे ॥ १४० ॥

श्रोत्रादि ज्ञानइंद्रिय । ते ज्ञानशक्ति निःसंशय॥
शव्दादि पंच विषय । तें इच्छाशक्ति ॥ १४१ ॥

वाकादि कर्मेंद्रियपंचक । तें क्रियाशक्ति मुख्य ॥
यवं शक्ति पृथक । पंचविध ॥ १४२ ॥

आतां दशनाडीची विवरता । स्थानासहित आदिदेवता ॥
सांगिजेल हे अर्था— । अ[illegible]नेची ॥ १४३ ॥

श्लोक : डाश्च पिंगलाश्चेव । सुषुम्नाच तृतीयकं ॥
गांधारी हस्तजिव्हांच । पूषाचैव पयस्विनी ॥
अलंबुल कुहश्चैव, शंकिनि दश नाडिकं ॥ ३० ॥

॥ टीका ॥ ईडा चंद्रनाळ वामस्वरीं । तया आदि देवता हरी ॥
पिंगळा सूर्यनाळ दक्षिणखरीं । ब्रह्मा आदि देवता ॥ १४४ ॥

सुषुम्ना मध्यनाळ विवर । तया आदि देवता रुद्र ॥
गांधारी दक्षिण नेत्र । इंद्र आदिदेवता ॥ १४५ ॥

हस्ताजिव्हा नाळ वामनयन । तया आदिदेवता वरुण ॥
पूषा दक्षिण कर्ण । दिशा आदि देवता ॥ १४६ ॥

पयस्विनी वामकर्ण । आदिदेवता पद्मोद्भव कारण ॥
लकुह गुद नाळस्थान । भूमी आदिदेवता ॥ १४७ ॥

अलंबु गुह्य नाळस्थान । आदिदेवता सूर्यभान ॥
शंकिनी नाळ नाभिभुवन । चंद्र आदिदेवता ॥ १४८ ॥

हें दशनाळ कथन । आतां सांगिजेल अनुसंधान ॥
अष्टात्मया विवरण । करूनिया ॥ १४९ ॥

जीवात्मा, अंतरात्मा । परमात्मा, निर्मळात्मा ॥
शुद्धात्मा, ज्ञानात्मा, भूतात्मा । महात्मा यवं अष्टात्मक ॥ १५० ॥

देह–इंद्रिय–प्राण । तद्युक्त होउनी तद्रक्षण ॥
वर्ते देह मी ह्मणऊन । तो जीवात्मा ॥ १५१ ॥

सूक्ष्मरूपें देहा आंतु। विचित्र वेव्हार कल्पितु।
स्थीर न [1]व्हाये चंचळस्थितु। तो अंतरात्मा ॥ १५२ ॥
देहद्वयाचें लक्षण। घालुनि गर्भि जाणपण ॥
वर्ते तम अज्ञान। तो परमात्मा ॥ १५३ ॥
सर्व क्लुप्त[2] ज्ञान। देहत्रयांसी विलक्षण ॥
सुखरूप विद्यमान। तो निर्मळात्मा ॥ १५४ ॥
सकळ प्रपंच विलक्षण। मायादि मळाविहीन।
तो शुद्धात्मा निपुण। अमळ सर्वदा ॥ १५५ ॥
तत्वं पदार्थाचा उगवो। जाणे सर्वज्ञत्वें अभिप्रावो।
कदा न भुले स्वानुभवो। तो ज्ञानात्मा ॥ १५६ ॥
अखिळतां भूत तद्युक्त। व्याप्य चराचरीं समस्त ॥
तो भूतात्मा विख्यात। सर्वथैव ॥ १५७ ॥
अखिळ ब्रह्मांड गर्भी करूण। सबाह्याभ्यंतरी पूर्ण चैतन्य ॥
तो महात्मा निर्गुण। गुणातीत ॥ १५८ ॥
हे अष्टात्मया विवरण। आतां सांगिजेल अष्टतन ॥
संकळित कथन। कीजेल तयाचें ॥ १५९ ॥
स्थूळ-सूक्ष्म–कारण। निर्मळ, चिन्मय, आनंद-घन ॥
चिद्रूप शुद्धतन। यवं तनु अष्टक ॥ १६० ॥
स्थूळ तनु पंचभौतिक। सूक्ष्मतनु वासनामय मुख्य ॥
कारण तनु विशेष। अविद्यामय ॥ १६१ ॥
निर्मळ तनु शुद्ध सद्रूप। आनंदतनु अनंतरूप ॥
चिन्मय तनु प्रदीप। प्रकाशमय ॥ १६२ ॥
चिद्रूपतनु अष्टमूर्ति। शुद्धतनु मुळ प्रकृती ॥
यवं अष्टतनु स्थिति। अभिप्र वो ॥ १६३ ॥
आतां अंतरीं अष्टमद। विचरती प्रसिद्ध।
ते सांगिजती विशुद्ध। अनुक्रमे ॥ १६४ ॥
संस्थिती, वर्तनीं। तृणीकृती, क्रोधिनी, मोहिनी :
अतिचारिणी, दंभाचारिणी, वासनी। यवं मदाष्टक ॥ १६५ ॥

---

१ न राहे. २ पूर्ण.

नाना संशयो अंतरीं । चुंबकपणें विश्वास न धरी ॥
सत्यत्यागे देह अहंकारो । तो संस्थिति मद ॥ १६६ ॥
ह्मणे माझी वर्तणुक । वर्तो न सकती ब्रह्मादिक ॥
आणि आपण करी अविवेक । तो वर्तनी मद ॥ १६७ ॥
अभिमान जाणपणें । अपसिद्धांत स्थापणें ।
साधु सत्शास्त्र उच्छेदणें । तो तृणकृती मद ॥ १६८ ॥
सदा राग-द्वेष अंतरीं । कोपे देव द्विजांवरी ।
तो बोलिजे निर्धारी । क्रोधनी मद ॥ १६९ ॥
मनीं पुत्र कलत्रांची आवडी । मी माझेपणाची प्रौढी ॥
बंधेवीण जोडुनि घे वेडी । तो मोहिनी मद ॥ १७० ॥
वर्ते अशुचि अनाचार । विपरीत ज्ञानविकार ॥
न मनीं श्रेष्ठांचें करणेर । तो अतिचारिणी मद ॥ १७१ ॥
मनीं नाहीं श्रद्धा-प्रेम । लोकरंजन करी, सकळकर्म ॥
आपण श्रेष्ठ ह्मणवी हा भ्रम । तो दंभाचारिणी मप ॥ १७२ ॥
मनीं दुर्वासनेचा डंवरु । विषयरसीं पडिभरु ॥
कदा संतुष्ट ना स्थिरु । तो वासनी मद ॥ १७३ ॥
इति अंतर्मदाष्टक । आतां बहिरंग मद कंचुक ॥
सांगिजेल पृथक । विविधापरी ॥ १७४ ॥

श्लोक : कुळ छळ धनश्चैव । रूप यौवन मेवच ॥
विद्या राज्य तपश्चैव । एते चाष्टमद स्मृतः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ कुळ, छळ, धन, रूप । यौवन, विद्या, राज्य, तप ॥
हे अष्टप्रद आरोप । प्राणियासीं ॥ १७५ ॥
आपुलें कुळ निष्कलंक शुद्ध । मना अंतरीं हाचि बोध ॥
अनु[1] कुळां करी निशध । तो कुळमदीवा मद ॥ १७६ ॥
आपुलें करणें धरणें । न सोडी न मनीं श्रेष्ठांचीं वचनें ॥
सत्यार्थासी करीं दुशनें[2] । तों छळा मदिया ॥ १७७ ॥
मजतुल्य अन्य धनाढी । नाहीं क्षिती आंतु छपन्न कोडी ।
म्हणे कुबेराची कायसी प्रौढी । तो धनमदीया बोलिजे ॥ १७८ ॥

---

१ अन्य = दुसऱ्यांच्या कुळांचा. २ दुश्चिन्हें.

माझें तारुण्य वैय्या भोग। शक्ति-सुंदरता रंग॥
इंद्रादिकां नाहीं हें योग्य। म्हणे तो यौवनमदीय ॥ १७९ ॥
माझें जैसें रूप लावण्य लक्षण। या समान अन्य कवण।
जाला तरी यक मदन। म्हणे तो रूपमदीया ॥ १८० ॥
मी सकळ विद्या पारंगता। येणें गर्वें नमनी संत-महंता ॥
करी वाग्वाद चुकोनि सत्या। तो विद्यामदीय ॥ १८१ ॥
राज्याचेनि सुख समृद्धी। इंद्रादि क्षितीपतीते निषेधी ॥
पापपुण्याची विधी। न कळे राज्यमदीया ॥ १८२ ॥
तपार्चेनि विशेष गुणे। सकळ अलक्ष करणें
ब्रह्मादिकांवरी कोपणें। तो रूपमदीया ॥ १८३ ॥
हे अष्टमद विशेष। आतां सांगिजती अष्टपाश ॥
जेणें मोहिलें सकळ पुरुष, प्राणिमात्र ॥ १८४ ॥

श्लोक : घृणं, शंका, भयं लज्जा। जुगुप्सा, इतिपंचकं ॥
कुळा शिळा वृतश्चैव, अष्टपाश प्रकीर्तितः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ घृण, शंका, लज्जा भीता। जुगुप्सा, कुळा, शिळावृता ॥
हे अष्टपाश वर्तता। देहीयासी ॥ १८५ ॥
दया अधिष्ठोनि हृदयकमळीं। मायादि प्रपंचभूत कृपाळी।
मी दयाळु ऐसें सांगे जगा जवळी। तो घृणापाश ॥ १८६ ॥
मनीं चंचळ चुंबकु अविश्वासी। विसिष्टां शंकोनी हेतु मानसी ॥
पाठी वंदी स्वहितासी। तो शंकापाश ॥ १८७ ॥
पाप पुण्याच्या विभागु। करूनि वर्ते शुद्धांगु।
न करी हिंसा पाप प्रसंगु। तो भीतापाश ॥ १८८ ॥
मनीं सर्वदा कंटाळा। उत्तमाऽधमा मानी विटाळा।
स्वशुची सांगे वेळोवेळा। तो जुगुप्सा पाश ॥ १८९ ॥
श्रेष्ठ प्रमाणें आचरणें। अयासे आपण करणें।
मी कर्मीष्ट ऐसें सांगणें। तो लज्जापाश ॥ १९० ॥
कुळ पारंगत पुरुषार्थ महिमा। स्वविध विहीत कर्मा ॥
जगीं सांगे स्वधर्मा। तो कुळापाश ॥ १९१ ॥

स्वयंपाकी नित्य स्नान । दृष्टीदोष देवतापूजन ।
करी पुरांतन विहित जनरंजन । तो शिळापाश ॥ १९२ ॥
व्रत नेम देवतार्चनें । फळसिद्धि जालेपणें ॥
जगीं तेंचि मिरविणें । तो व्रतापाश ॥ १९३ ॥
आतां अष्टमूर्ति मद । सांगिजेति यथाविध ॥
करूनियां विशद । अनुक्रमें ॥ १९४ ॥
पृथ्वी, सलील, पावक, पवन । अंबर, रवि, शशी चैतन्य ॥
यवं अष्टमूर्ति तन । मद बोलिजे ॥ १९५ ॥
चढे पृथ्वीमदाची लहरीं । वस्त्राभरण, तांबूल, गंध इच्छाधरी ॥
अन्य वृत्ति त्यागें तद्युक्त शरीरीं । करी क्षिती मद ॥ १९६ ॥
सलील मद शरीरीं उठी । मायादि पुत्र दारावरी मोह कोटी ॥
करी तदाकार अन्यवृत्ती तळवटी । तो आपमदीया बोलिजे ॥ १९७ ॥
चढे पावकमदाचा भरु । उठे कामचेष्टा पडिभरु ॥
सकळ त्यागें करी तदाकारु । करी तो अग्निमद ॥ १९८ ॥
पवन मदाचा कल्लोळु । गमन साध्य दयवरी उल्लाळु ॥
करीत चाले प्रबळु । तो वायो मद बोलिजे ॥ १९९ ॥
अंबर मदाचा मोहो । कल्पी राज्यसुख गज संमोहो ॥
तया ऐसें करी त्याग निःसंदेहो । तो आकाशमद ॥ २०० ॥
चढे रवि मदाचा अतिभरु । मनीं सपुर बाधा क्रोध ज्वरु ॥
विचार सांडुनि तम अंधःकारु । करी तो सूर्यमद ॥ २०१ ॥
उठे शशीमद शरीरीं । मनीं भ्रमित संकल्प विकल्प लहरी ॥
साध्यासाध्य श्रद्धाधरी । तो चंद्रमद बोलिजे ॥ २०२ ॥
उठे आत्ममद आयासे । सुबुद्धि त्यागे करी आपणा ऐसे ॥
तदाकारें वर्ते सावकाशे । तो चेतनामद ॥ २०३ ॥
जेवेळीं ज्या मदाचा विकासु । तो अन्य सकळांचा करी ग्रासु ॥
वर्ते आपरसे विशेषु । हा मद स्वभावो ॥ २०४ ॥
आतां अष्ट पुरी विवरण । करूनि कीजेल कथन ॥
अनुक्रमें भिन्न भिन्न । सांगिजेल ॥ २०५ ॥

श्लोक : ज्ञानेंद्रियाणि खलु पंच तथा पराणि ।
कर्मेंद्रियाणि मजसा चतुष्टयंच ॥
प्राणादि पंचकथो विविधादिकंच ।
कामंच कर्मंच तम पुरष्टमीच ॥ ३३ ॥

॥टीका॥ श्रोत्र, त्वचा, जिव्हा, घ्राण । यवं पूर मिळोनि कारण ।
वाचा, पाद, पाणि, गुद, शिस्न । हें दुसरें पूर ॥ २०६ ॥
शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध । हें तिसरें पूर प्रसिद्ध ॥
प्राणादि पंचक विविध । चतुर्थ पूर ॥ २०७ ॥
मन, बुद्धि, चित्त, अहंकार । पांचवें पूर विस्तार ॥
अविद्या, काम-कर्म त्रिपुर । यवं पूर अष्ट हें ॥ २०८ ॥
आतां सप्त धातुची उत्पत्ति । कर्म वर्णन-ऽस्थिति ॥
सांगिजेल विस्तृत्ति । अनुक्रमेची ॥ २०९ ॥

श्लोक : रसो रूधिर मांसश्च, मेद, मज्जास्थि रेतसा ।
सप्त धातु मिदं प्रोक्तं । सर्व देह समाश्रितः ॥ ३४ ॥

रस, रुधिर, मांस, मेद : मज्जास्थि, रेत यवं सप्त विध ॥
यांची उत्पत्ति विशद । अनुक्रमेची ॥ २१० ॥
पंचभुतिक धान्याचा पाक । जठरीं पचे एक सप्तक ॥
मग रस होय विशेष । भावना दशे ॥ २११ ॥
द्वितीय सप्तकीं रुधिराकृति । तृतीय मांस मेद चतुर्थी ॥
मज्जास्थि रेत स्थिति । येणेंचि न्याये ॥ २१२ ॥
रस पृथ्वीचा अंश । कपिलवर्ण प्रभा-प्रकाश ॥
तयाचें लक्षण देही प्रकाश । सकळ वद्धत्व ? ॥ २१३ ॥
रुधिराचें आपकरण । प्रभा नीळवर्ण ॥
तें करी देहीं लक्षण । शैत्यत्व बाधा[1] ॥ २१४ ॥
मांस अंश अग्नीचे । प्रभा रक्तवर्ण साचे ॥
देहीं वद्धकत्व तयाचें । अंधारी विकल्पता ॥ २१५ ॥
वायुचे अंश मेद । मंजिष्ट वर्ण प्रसिद्ध ।
ते शरीरी करी बाध । भयाभीत ॥ २१६ ॥

१ येथील अक्षरें कसरीनें खाल्लीं आहेत.

अस्थि आकाशाचा अंश । प्रभा श्वेतवर्ण प्रकाश ॥
ते देहीं करी भ्रांति–भ्रमविकाश । हा स्वभावो तयाचा ॥ २१७ ॥
मज्जा शिर विकारण । प्रभा ताम्रवर्ण ॥
देही बासने विकल्पोन । हें तंव लक्षण तयाचें ॥ २१८ ॥
चंद्राचें अंशक रेत । तें प्रसिद्ध प्रभा श्वेत ।
तें शरीरीं करी विकार शैत्य । मूर्च्छा कंपित ॥ २१९ ॥
आतां सप्त धातुचें वेषण विवर । लक्षण तद्विकार ॥
सांगिजती व्यापार । विविधापरी ॥ २२० ॥
तन-मन-धन, राज्य सुख । विश्व उच्छाक सेवक ॥
यवं समुह मुख्य । सप्त वेषणं हें ॥ २२१ ॥
तनु वेषण प्रगटे चित्तीं । देहावरी उठे प्रीति ॥
मी पुष्टा पुष्ट वृत्ति । तिष्ठें अनुसंधानें ॥ २२२ ॥
मन वेषणाची लहरी । विचित्र कल्पना करी ॥
इच्छी परद्वार चोरी । हा स्वभावो तयाचा ॥ २२३ ॥
धन वेषणाचें लहरें । कल्पी पदार्थ रत्न हिरे ॥
सुवर्णादिक नाना अलंकारें । हे इच्छा धरी ॥ २२४ ॥
चित्तीं प्रगटे राज्य वेषण । कल्पी गंधलेप राज्य-भूषण ॥
अश्व गज नरादि सैन्य । हे इच्छा धरी ॥ २२५ ॥
विश्व वेषणाची बुद्धि । कल्पी सुधान्या शरीर संमधी ॥
गृह दारा–गोत्रादि । मोहो धरी ॥ २२६ ॥
उत्सावो प्रगटालिया चित्तीं । पुत्र, कन्या, स्त्रीवरी प्रीति ॥
कल्पी विवाहो लग्न सुखप्राप्ति । हा स्वभावो तयाचा ॥ २२७ ॥
प्रगटालिया सेवक वेषण । कल्पी साथ गमना गमन ॥
गृह दारा, पशुप्रति पाळण । मोहोधरी ॥ २२८ ॥
आतां सप्तावरण सांगेन । अविद्या, विंक्षेप क्लेशावरण ॥
चिंता, भ्रम, मत्त, विद्या यवं भिन्न । सप्तावरण हें ॥ २२९ ॥
मीं देहाचे सप्त तनुप्रमाणें । हा जडभाव दृढ बद्धपणें ॥
कल्पांति स्वरूप नाहीं जाणणें । तें अविद्यावरण ॥ २३० ॥

राग-द्वेष-मोह वेष्टणें । अच्छादोनि सुखपणें ॥
सदा दुःखरूप असणें । तें विक्षेपावरण ॥ २३१ ॥
कल्मषमय होउनि बुद्धि । सदा संकल्प-विकल्प संधी ॥
कदा न देखे स्वइच्छता आवधी । तें क्लेशावरण ॥ २३२ ॥
चित्ता व्याकुळ भ्रमणा । असंभावना विपरीत भावना ॥
वश्य होउनि असे चेतना । तें चिंतावरण ॥ २३३ ॥
आपण सर्वथा जाणे । आपणा जाणावया शक्तु म्हणे ॥
कदा आपणया आपण नाहीं जाणणें । तो भ्रमावरण ॥ २३४ ॥
मत्ताभिमान महत्वानें । नेणोनि विशिष्टां दूषणें ॥
दुःख शब्दे संभाषणें । तें मत्तावरण ॥ २३५ ॥
सकळ शास्त्र संपन्नपणें । फुगोनी देह विद्याभिमानें ॥
वा द्वैत स्थापणें । तें विद्यावरण ॥ २३६ ॥
आतां षड्ूर्मी विवरण । क्षुधा आणि पिपाशण ॥
शोक, मोहो, जरा, मरण । येणें नांवें ॥ २३७ ॥
क्षुधा-पिपासा उभयतां । प्राणधर्म सर्वथा ॥
सुख दुःख, स्वधर्मता । उभय मनाचें ॥ २३८ ॥
जरा आणिक मरण । हें उभय शरीरीं लक्षण ॥
हा स्वभाव देहप्रमाण । मन तृतियेचा ॥ २३९ ॥
आतां काम-क्रोध-लोभ मोहो । मद-मत्सर अरी वर्ग हो ।
असती अश्रुंनि सर्व देहो । ते सांगिजती ॥ २४० ॥
इह लोकादि परलोकांत । विषयभोग अपेक्षित ॥
हें मनांत श्रद्धा प्रीत्यर्थ । तो काम म्हणवी ॥ २४१ ॥
काम साध्य जरी वश्य नव्हे । तरी मन जल्पोनि दुःखमय ॥
उपजे मूर्च्छा भूतमय । तो क्रोध म्हणावा ॥ २४२ ॥
देहादि प्रपंच जाति । तथा प्राणाहुनि अति प्रीति ॥
न सोडी कपी मुष्टी दृश्यानुभूति । । तो लोभ म्हणाया ॥ २४३ ॥
देखिलियां दृश्य पदार्था । तयावरी अति ममता ॥
अपेक्षावश होय तया अर्था । तो मोह म्हणावा ॥ २४४ ॥

---

१ आश्रवुन = व्यापून.

रज तम कर्म निबंध । होउनि मूढत्वें स्तब्ध ॥
सदा गर्वमग्नै असे मुग्ध । तो मद म्हणवी ॥ २४५ ॥
अन्य सत्यार्थ गुण करिती । ऐकोनीं जल्पे चित्तीं ।
तयासी करी वाग्वाद स्थिती । तो द्वेष ह्मणवी ॥ २४६ ॥
आंतां सांगिजेल षडाश्रम । जाती वर्णाश्रम ॥
कुळ गोत्र नाम । यणें नांवें ॥ २४७ ॥
ब्राह्मण क्षेत्रीै वैश्य शूद्र । पृथक देह अहंकार ॥
अहं उत्तम दृढविचार । तो जातिभ्रम ॥ २४८ ॥
अठरावर्ण जाति । त्यामाजीं माझी उत्तम स्थिति ॥
हा अभिमान अभिलाष असे चित्तीं । तो वर्णाश्रव भ्रमु ॥ २४९ ॥
ब्रह्मचारी गृहस्थ । वानप्रस्थ अवधूतै ॥
यक येक विशेष ह्मणत । तो आश्रमभ्रमु ॥ २५० ॥
मी आपस्तंब, अश्वलायन । सामक, अथर्वण ॥
पृथक आश्रिला अभिमान । तो कुळ भ्रमु ॥ २५१ ॥
कश्यपात्रि, भारद्वाजमुनी । विश्वामित्र, गौतम जमदग्नि ॥
वसिष्ठादि पृथक जनी । तो गोत्र भ्रमु ॥ २५२ ॥
ब्रह्मा-विष्णु-रुद्र । हिरण्यगर्भादि देवताचक्र ॥
हा सकळ विस्तार । तो नामभ्रमु ॥ २५३ ॥
आस्तीते, जायते, विवर्द्धते । विपरिणमते, अपक्षीयते ॥
हेंै षडभाव विकार निरुते । देहादिक ॥ २५४ ॥
आस्तीतें ह्मणिजे गर्भीवासु । जायते ह्मणिजे जन्म शिषु ॥
विवर्द्धतेही विशेषु । बाळकदशा ॥ २५५ ॥
विपरिणमतें तें यौवनत्व । अपक्षीयतें तें वृद्धत्व ॥
विनश्यतितें मृत्युत्व । हे षड्भाव विकार ॥ २५६ ॥
आतां षटकोश देहाचे । सांगिजती साचे ।
माता आणि पितयाचे । मिळोनिया ॥ २५७ ॥
अस्थि, शिरा, मज्जा इति । हें त्रयकोशाची स्थिति ।
पितयांचे जाणिजती । विस्तारुनी ॥ २५८ ॥

१ गर्वमग्न. २ क्षत्रिय. ३ सन्यासी. ४ येथें 'नश्यते' हा सहावा विकार सांगण्याचें राहिलें आहे.

त्वचा, रुधीर, मांस । इति तृतीय कोश ।
जाणिजती अंश । मातेचे पै ॥ २५९ ॥
आतां जाणिजती पंचक्लेश । अविद्या, अस्मित्व[1], राग, द्वेष ॥
आणि पांचवा अभिनिवेश । इति क्लेशपंचक ॥ २६० ॥
निज विसरोनी आपण भिन्न । जे माया मूळ अज्ञान ॥
तेथ वसे तोचि मी ह्मणउनि मग्न[2] । ते अविद्या ह्मणावी ॥ २६१ ॥
धरूनि दृढ अहमस्मि । इया जडभावे शिरकोनी देहधर्मी ॥
नुगवे मज सर्वदा तमी । ते अस्मित्य ह्मणावी ॥ २६२ ॥
सकळ विषय मदी । तया अभिलाषे वसे चित्त बुद्धी ॥
सदा असत्य विषय संधी । तो राग ह्मणिजे ॥ २६३ ॥
विषयाचें जें सुख । न लभतां पीडी आखिल लोक ॥
ऐक्या आसे ( ? ) निमित्य करी दुःख । तो द्वेष म्हणवी ॥ २६४ ॥
यक येक विषयांत होउनिया लोलुस । न सोडीच वेदांत निंदेंत रत ॥
तेणें योगें होय दुःखी संतप्त । तो अभिनिवेश ॥ २६५ ॥
आतां अन्नमय, प्राणमय । मनोमय, विज्ञानमय ॥
आनंदमय निःसंशय । हे पंचकोश ॥ २६६ ॥
अन्नमय पंचभूतिक । स्थूळ देह कंचुक ॥
यातें बोलिजें मुख्य । अन्नकोश ॥ २६७ ॥
प्राणमय इंद्रिय दशक । तद्लक्षण अशेख ॥
तया बोलिजे विशेष । प्राणकोश ॥ २६८ ॥
मनोमय करण चतुष्टय । तद्लक्षण समुदाय ॥
तया ह्मणिजे तृतीय । मनोकोश ॥ २६९ ॥
तें तृतीयांत असोनि विलक्षण । सर्वकाळीं विद्यमान ॥
होउनि वर्तत असे जाण । ते विज्ञानकोश ॥ २७० ॥
दृश्यत्यागें आत्मधारण । वृत्ती तदाकारेंचि स्फुरण ॥
बोले प्रेमसुख संपूर्ण । तो आनंदकोश ॥ २७१ ॥
आतां चतुष्टय पंचक सांगेन । उन्मत्त, उद्वेग, उदासीन ॥
चौथें उचीष्ट यवं भिन्न । चतुष्ट पंचक ॥ २७२ ॥

---

१ अस्मिता. २ मग्न.

पहिलें पंच विंशती । विषयाभिलाषाची वृत्ति ॥
मझेत्वें असे नेणोनि स्थिति । म्हणउनि उन्मत्त पंचक ॥ २७३ ॥
दुसरीय पंचविंशी । स्त्रियादि सकळ कुटुंबासी ॥
गृहस्थाभिमानें पोषी । म्हणउनि उद्योगपंचक ॥ २७४ ॥
तिसरीय पंचविंशी । आसक्ति वरी पुत्रकलत्रादि दुसी ॥
तेणें उपजवी मोह विरक्तिसी । यालागीं उदास पंचक ॥ २७५ ॥
चौथीस पंचवीशक्ति । वात, पित्त, श्लेष्मादि शश होती ॥
गात्रें पालटोनि झरो लागती । यालागीं उच्चिष्ट पंचक ॥ २७६ ॥
आतां अंग, प्रत्यंग, उपांग । आणि चौथे सांगांग ।
यांचा सांगिजेल विभाग । अनुक्रमें ॥ २७७ ॥
शिरकमळ, उरस्थळ । भुजाद्वय चरण कमळ ॥
म्हणिजे अंग स्थूळ । येणें नांवें ॥ २७८ ॥
वदन नासिक, कर्ण । अधर, अंगोलिया नयन ॥
बोलिजे याला गुण । प्रत्यंग अंग ॥ २७९ ॥
ज्ञातृ मन, बुद्धि, चित्त, अहंकार । करणें भोगवृत्ति व्यापार ॥
तो समूह विस्तार । सांगांग पैं ॥ २८० ॥
वस्त्रें नानाविध सुरंग । अलंकार गंध-लेप उपभोग ॥
यासीं बोलिजे उपांग । चौथें अंग हें ॥ २८१ ॥
आतां सत्व रज तमोगुण । ययासी विविध वर्ण ॥
तें सांगिजें भिन्न भिन्न । करूनिया ॥ २८२ ॥
सत्वगुण असे श्वेत । रजोगुण तो रक्त ॥
तमोगुण कृष्ण निभ्रांत । जाणिजेसु ॥ २८३ ॥
आतां सत्व रज तम त्रिगुण । याचें गुणदोष लक्षण ॥
सांगिजेल विवरण । करूनिया ॥ २८४ ॥

श्लोकः— सत्य ज्ञान तपो मौन, श्रुतिधर्म तितिक्षमा ॥
उत्साहं निश्चयं धैर्यं । सात्विकं गुण लक्षणं ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ सत्यवाचा श्रुतिधर्म । तापसी मानिती कर्म ॥
क्षमा दयाळ निष्काम । सत्यवृत्ति तितिक्षमा ॥ २८५ ॥

१ ममत्वें.

निश्चय ज्ञानि निपुण । धैर्यंद स्थान संतुष्टमन ।।
यवं हें लक्षण । सात्विकांचें ॥ २८६ ॥

श्लोकः— सर्वं क्रोधातिहंकार । सत्यसंग प्रलापनं ॥
आक्रमे डंवं मानंच । राजसं गुण लक्षणं ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ अती गर्व अती अहंकारी । परमक्रोधी या परद्वारी ॥
असतु विपय लहरी । सर्वदा मनी ।। २८७ ॥
अविश्वासी चुंवकु । अकर्मी डोंबिकु ॥
इया लक्षणीं वर्तणुकु । राजसांचा ॥ २८८ ॥

श्लोकः— अज्ञानि मोह निद्राच । चापल्यं वुद्धि हीनच ॥
पापिष्ठं परवाधित्वं । तामसं गुण लक्षणं ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ अज्ञानी यास्तव स्तब्धिकु । निद्राळु अति माहीकु ॥
पापिष्ट आणि हिंसकु । परम द्रोही बोलिजे ॥ २८९ ॥
परवाधक अतिचपळु । वुद्धिहीन सदा विकाळु ।
यालक्षणीं समेळु । तामसीयासी ॥ २९० ॥
आतां तनुत्रयाचें निर्माण । सांगिजेल भिन्न भिन्न ॥
पृथ्वी आप मिळोन । स्थूळ तनु ॥ २९१ ॥
तेज आणि पवनु । उभययोगें सूक्ष्मतनु ।
अहंकार आकाश मिळोनु । तनु कारण ॥ २९२ ॥
आतां विश्व, तैजसु, प्राज्ञ । तयासी परियायच ज्ञान ॥
तें सांगिजेल भिन्न । विशद करूनी ॥ २९३ ॥
देहादि जगाची व्याप्ति । वेवधानें जाणें जागृती ॥
ह्मणउनी विश्व ऐसी नामस्थिति । तयालागी ॥ २९४ ॥
व्योमादि विषय स्थिति । खेचर गमनादि साभास स्मृति ॥
वेवधानें जाणें स्वप्नानुभूती । यालागीं तैजसु नाम ॥ २९५ ॥
त्रिपुरीचें नसें जाणणें । परी तया गर्भी करूनि ज्ञानें ॥
तमचक्षु जाणें तैसा जाणें । ह्मणउनी प्राज्ञ नाम ॥ २९६ ॥
आतां अहंकार त्रय विवेकु । तामस राजस सात्विकु ॥
तीय पृथक पृथकु । तत्वें जालीं ॥ २९७ ॥

---

१ दंभ.

सात्विक अहंकार जनित । सूर्यादि देवता समस्त ॥
अंतःकरणादि चतुर्थ । प्रसवला तो ॥ २९८ ॥
राजस अहंकारापासाव । इंद्रिय दशक सावेंव ॥
प्राणादिपंचक उद्भव । जन्मजाला ॥ २९९ ॥
तामस अहंकारा पोटीं । पंचभूतें झाली सदेठी ।।
पंच विषयाची परिपाठी । तेथेंचि वर्तली ॥ ३०० ॥
आतां वात पित्त श्लेष्म । उत्कर्ष होती परम ॥
देती त्रिदोष विषम । बाधा होय ।। ३०१ ॥
वात पित्त त्यजुनियां । एक मेकां मिळुनिया ।।
तेणें होय अतिशया । वातोत्कर्षु ॥ ३०२ ॥
सलिलेचे विशेष धातु । मिळालिया अग्नि आंतु ॥
तेणें होय उदितु । पीत्तोत्कर्षु ॥ ३०३ ॥
विशेषीं मिळालिया किंचितु । तेणें अतिशया उद्दितु ।
वात पित्त मज्जा आंतु । श्लेष्मोत्कर्षु ॥ ३०४ ॥
आतां आध्यात्मिक आदिदैविक । तिसरें आदिभौतिक ॥
या तापत्रयाचा विवेक । सांगिजेल ॥ ३०५ ॥
ताप उर्मी आध्यात्मिक । तया उभयपक्ष विवेक ।।
शरीर आणि मानसीक । यणें नामें ।। ३०६ ॥
त्रिदोप संमंध नवग्रह । गौ. व्याघ, सर्प, राज्य, चोरभय ॥
ज्वर, गुल्म, शूळ बहु हें । व्याधी म्हणीजे ।। ३०७ ।।
सूया, असूया, मद, मत्सर । द्वेष, क्रोध हे मनोज्वर ॥
यवं शरीर-मन तापाग्नि उत्तर । आध्यात्मिक बोलिजे ।। ३०८ ॥
श्रोत्र-त्वक-चक्षु-जिव्हा-घ्राण नासु । वाकादि इंद्रिया हरासु ।।
क्षुधा-तृषा तापाग्नि विशेषु । आदिदैविक ।। ३०९ ।।
शीत-उष्ण' वात-पित्त पिशाच भूत । बीज, शस्त्र, ग्रहभय भृत्य ॥
यणें तापाग्नी बाधकत्व सत्य । आदि भौतिक ।। ३१० ॥
क्षया अतिशया सहज पतन । स्वर्ग तापत्रय तत्साम्र ।।
यासी कीजे विवरण । यथाविधी ॥ ३११ ॥

भोगितां स्वर्ग भोग सुसप्रता । हरास क्षणि मुक्तता ॥
तेणें धारणें मनीं उर्मी व्यथा । तो क्षया तापु ॥ ३१२ ॥
दिव्यभोग केलिया प्रमाणें । आनंदे देखोनि विवश भोगणें ॥
मनीं जल्पे उर्मी तेणें ! तो शयाताप ॥ ३१३ ॥
क्षीण जालिया पुण्य संचित । लोटती मृत्यु लोकांत ॥
तेणें तापे अति संतप्त । तो साहसताप ॥ ३१४ ॥
जीवात्मा अंतरात्मा । तिसरा तो परमात्मा ॥
यथांची स्थिति महिमा । बोलिजेल ॥ ३१५ ॥
स्थूळादि इंद्रिय व्यापारु । अधिष्ठोनि देह अहंकारु ॥
वर्तवी बाह्य जागृत वेव्हारु । तो जीवात्मा म्हणिजे ॥ ३१६ ॥
लिंगादि सप्तदशकता । अधिष्ठोनि सूक्ष्म अहंता ॥
वर्तवी स्वप्न अवस्था । तो अंतरात्मा बोलिजे ॥ ३१७ ॥
ग्रासुनि देहद्वय व्यापारु । अधिष्ठोनि तम अंधःकारु ॥
वर्तवी सुषुप्ति अवस्था महा घोरु । तो परमात्मा जाणिजे ॥ ३१८ ॥
ज्ञानविकृती, वर्तनी विकृती, । तृतीय मोहनी विकृती ॥
इया दृश्य भावाची स्थिति । सांगिजेल ॥ ३१९ ॥
वेदान्त श्रवणें दृश्य मिथ्या । ह्मणे अहंब्रह्मास्मि वागादि द्वैता ॥
इया जड वासने तिष्ठता । तो ज्ञान विकृती भाव ॥ ३२० ॥
संकल्पुनी स्वर्ग भोग सिद्धि । विहीतकर्मी दृढबुद्धि ॥
तिष्ठे वासना इंद्रिय विधि ॥ तो वर्तनी भावो ॥ ३२१ ॥
कर्मज्ञानी अधिकु । अहं जीव भावे मोहीकु ॥
लोलुप्त वासना विशेषु । तो मोहिनी भावो ॥ ३२२ ॥
प्रकाशन प्रवर्तन । तिसरें तें मोहन ।
इया सद्भाव लक्षण । बोलिजेल ॥ ३२३ ॥
श्रुति गुरुस्वानुभव भरे । दृश्य मिथ्या साक्षात्कारे ।
सकळ ०[1]० वृत्ती स्फुरे । तो प्रकाशन ॥ ३२४ ॥
स्वर्ग सिद्धिवनी नसे सिद्धि । विहित कर्मी सहज बुद्धि ।
वस्तुयुक्त व्यापार आवधी । तो प्रेत्नं भावो ॥ ३२५ ॥

१ कसरीनें अक्षरें खाली आहेत. २ प्रयत्न.

कर्मज्ञानी आश्रयाधीकु । अहं वस्तुभावे मोहिकु ॥
लोलुप्त आत्मसुखीं विशेषु । तो मोहनी भावो ॥ ३२६ ॥
मन मनन मननीं । यकचि परी त्रिलक्षणीं ।
पूर्वपक्ष सिद्धांत करूनी । सांगिजेल ॥ ३२७ ॥
देह इंद्रिय प्राण । सकळ समोह ततू लक्षण ॥
भावी अहंदेह प्रमाण । तया मन बोलिजे ॥ ३२८ ॥
तया उठे विचार जाणीव । देहादि दृश्य मी आत्मा निरावेव ॥
अहंसाक्षी प्रमाणें अनुभव । तया मनन बोलिजे ॥ ३२९ ॥
वरी संत संगत्वें प्राप्ति । तेणें जाणणें नेणणें निवृत्ति ॥
मनन होय निष्कळ ज्ञप्ती । तया मननीं बोलिजे ॥ ३३० ॥
वाचिक काईक मानसीक । या कर्मत्रयांचा विवेक ॥
सांगिजेल पृथक । अनुक्रमेची ॥ ३३१ ॥
मनीं आठाविजें तें मानसीक । बोलिजेल तें वाचीक ।
शरीरें कीजें तें काईक । यवं त्रिविध कर्मे ॥ ३३२ ॥
आतां अंतःकरणाचें प्रमेय । सांगिजेल पर्याय ॥
एकाचि परी त्रय । करूनिया ॥ ३३३ ॥
मूढत्वदशे स्तब्ध । सदा होउनि असे बद्ध ॥
ह्मणउनि जन्मजन्मा प्रसिद्ध । बीज होय ॥ ३३४ ॥
मळीण दशे सदा । स्तस्थ निश्चय नसे कदा ॥
ह्मणउनि सर्वदा । कर्महेतु ॥ ३३५ ॥
देहादि सकळ ज्ञान । जाणें प्रकाशत्वें आपण ॥
साधन चतुष्टय संपन्न । त्यालागीं मुक्ति योग्य ॥ ३३६ ॥
आतां संचित प्राचीन । तृतीय क्रियमाण ॥
यासी करुनिया विवरण । सांगिजेल ॥ ३३७ ॥
अनंत सत्कर्मांचेन । वासनाबंध होउनि आपण ।
तनु करूनि भुवनानंद भोगण । तें संचित म्हणावी ॥ ३३८ ॥
तया संचिताचे प्रातिफळितार्थ । होउनि जालें निर्मित ॥
प्रत्यक्ष देह वर्तत । तें प्रारब्ध[1] ह्मणवीं ॥ ३३९ ॥

---

१ प्रारब्ध.

वरी सत्कर्म कोटि यागादी । कर्मामन वश्य होउनि संधी ॥
करी संचित पुण्य पापादि । तें क्रियमाण ह्मणावीं ॥ ३४० ॥
आतां सांगिजेल पंचाग्नि । उदराग्नि, मंदाग्नि ।
शोकाग्नि कामाग्नि । वडवाग्नि जाणिजे ॥ ३४१ ॥
स्वउदरासी सदा । आरंभलें सर्वदा ॥
तृप्ती नव्हे कदा । तें उदराग्नि ह्मणावी ॥ ३४२ ॥
क्षुधादि धर्म जालिया शांति । उपजे देहीं भय भीति ।
तेणें व्याकुळता होय चित्तीं । ते मंदाग्नी ह्मणावी ॥ ३४३ ॥
लाभालाभाचिया आशा । वश्य होउनिया मानसा ॥
पाविजे दुःख बहुवसा । ते शोकाग्नि ह्मणावी ॥ ३४४ ॥
गुह्य इंद्रयांचिया आनंदा । कंकुरत्वें नये कदा ॥
नोळखे आपपर निषेधा । ते कामाग्नि म्हणावी ॥ ३४५ ॥
सकळ ऐश्वर्य असोनि । कदा तृप्त नसे मनीं ॥
कल्पना उत्तरोत्तर जनीं । ते भवाग्नि म्हणावी ॥ ३४६ ॥
आतां पुत्रेषणा, वित्तेषणा । तिसरें तें दारेषणा ॥
याचे सांगिजे लक्ष्मणा । विशद करूनिया ॥ ३४७ ॥
मज असती अष्टपुत्र । मी सदैव भाग्याचा वर ॥
ह्मणवी जगांत मी थोर । ते पुत्रेषणा ह्मणावी ॥ ३४८ ॥
मज असती वित्ताचिया कोडी । मी अपाडांचा धनाढी ॥
बोले जगामाजीं प्रौढी । ते वित्तेषणा ह्मणावी ॥ ३४९ ॥
स्वस्त्री अति सुंदर । सुलक्षण युक्तवर ॥
ह्मणे मी भाग्याचा जगीं नर । दारेषणा ह्मणावी ॥ ३५० ॥
आतां अनव माया कार्मिक । मळत्रय-बंध अखिल लोक ॥
सांगिजेल विवेक । संज्ञामात्र ॥ ३५१ ॥
आपणा आपण विसरूनी । अज्ञान वश्य करूनी ॥
प्रारब्धदशे अनंत योनी । बद्धत्वें फिरवी ॥ ३५२ ॥
जन्म जन्मोनि पुनः पुन्हा मृत्यु । या सुख दुःखा नाहीं अंतु ॥
आपण आपणा जाणो नेदी कल्पांतु । ते अनवमळ ॥ ३५३ ॥

धनरागे वेष्टुनी । वासनात्मक करूनी ॥
असे मोहरूपें आच्छादुनी । तो मायामळ ॥ ३५४ ॥
शुभाशुभ केलिया । कर्मफळ द्याविया ॥
असे श्रद्धा हेतु होउनिया । कर्मफळ ॥ ३५५ ॥
आतां तनुत्रयाचें विवरण । समोह सहित लक्षण ॥
संकळीतें करून । बोलिजेल ॥ ३५६ ॥
धरणी जळ हुताशन । पवन आणि गगन ॥
पंचभूतीक मिळोन । स्थूळ तनु ॥ ३५७ ॥
जया जाग्रत अवस्था विश्वाभिमान । स्थूळ भोग नेत्रस्थान ॥
क्रियाशक्ति रजोगुण । अकार मातृका ॥ ३५८ ॥
श्रोत्र, वाचा, इंद्रिय दशक । प्राणादि वायोपंचक ॥
मनबुद्धि संयुक्त सप्तदशक । लिंग तनु हे ॥ ३५९ ॥
स्वप्नावस्था तैजसु अधिपती । प्रवाविक्त भोग कंठस्थिति ॥
सत्वगुण इच्छाशक्ति । उकार मातृका ॥ ३६० ॥
अंतःकरण तथाचित्त । अहंकार अज्ञान सहित ॥
यया चतुर्थ संयुक्त । कारण तनु ॥ ३६१ ॥
सुषुप्ती अवस्था अभिमानी प्राज्ञ । आनंदभोग हृदयस्थान ॥
द्रव्यशक्ति तमोगुण । मकार मातृका ॥ ३६२ ॥
आतां महा कारण शरीर । तेथें तुर्यावस्था निरंतर ।
प्रत्यगात्मा अभिमानी वर । मूर्ध्नीस्थान ॥ ३६३ ॥
आनंदावभास भोग । ज्ञानशक्ति संयोग ।
शुद्ध सत्वगुण चांग । ॐकार मातृका ॥ ३६४ ॥
आतां ईश्वर तनु चतुष्टय । सांगिजती समुदाय ॥
विविध परीधाय । सूक्ष्मरूपें पैं ॥ ३६५ ॥
ब्रह्मांड-देह अवस्था उत्पत्ति । सूर्यस्थान ब्रह्मा अधिपती ॥
अहंकार राजस क्रियाशक्ति । अकार मातृका ॥ ३६६ ॥
हिरण्यगर्भी देह अवस्था स्थिति । विष्णु अभिमानी चंद्रस्थानगती ॥
सात्विक अहंकार इच्छाशक्ति । उकार मातृका ॥ ३६७ ॥

प्रकृती देह प्रळयावस्था । आज्ञास्थान रुद्राभिमानता ॥
द्रव्यशक्ति तामस अहंकारता । मकार मातृका ॥ ३६८ ॥
मूळ प्रकृति शरीर । तेथ साक्षिणी अवस्था निरंतर ॥
ईश्वर अभिमानी वर । शुद्ध सत्वस्थान ॥ ३६९ ॥
चित्शक्ति संयोग निरंतर । अहंब्रह्मास्मि अहंकार ॥
मात्रा ते ॐकार । नाद रूप ॥ ३७० ॥
इति हें कारण विवरण । करूनि केलें निरूपण ॥
ते आत्मधर्म नव्हे ह्मणउन । प्रमाणसिद्ध ॥ ३७१ ॥
आतां यक अखंड नित्य । अंतर्बाह्य व्याप्त ॥
परि अविकारी संग रहित । वारे श्रुतिसार ॥ ३७२ ॥
हा अध्यात्म निरोपण अनुवाद । समाधानत्वें अनादिसिद्ध ॥
आला आत्मया प्रसिद्ध । आपला आपण पै ॥ ३७३ ॥
तो तत्वमसि महावाक्य । अनुभव गुरुमुखें ॥
जाल्यावीण निःशेषें । निव्राप्ति नव्हे ॥ ३७४ ॥
या ग्रंथाचा विचारु । गुरुमुखें घेईल जो नरु ॥
तयासि ब्रह्म साक्षात्कारु । रोकडाचि होय ॥ ३७५ ॥
ऐकत्या पढत्या जना । स्वयं होय प्राज्ञा[1] ॥
विघ्न निरसोनिया मना । शांति हातावसे ॥ ३७६ ॥
चेनबश्वेश्वरोक्ति । मियां बोलिलों अनुभूती ॥
प्रीति पावो विद्या पारंगती । ह्मणे सांता[2] नळिकंठ ॥ ३७७ ॥

ईतीश्री कर्णहंसकी विवरण संपूर्ण मस्तु-मंगल माहेश्वरी शुभंभवतु । पुस्तकं वनिता वित्तं । परहस्त गतेगतं । यदिवा पुनरा यांति । भ्रष्टं नष्टं त्रुटं तथा ॥ ३७॥ साद्यंत श्लोक टीकासंख्या ४१४ ॥

॥ श्रीरामकृष्णायनमः ॥



१ बुद्धिवान्. २ शांतलिंगप्पा ( ग्रंथकर्ता )

ॐ श्रीमातृभ्योनमः

# श्रीशांतलिंगप्पा महाराज यांचें चरित्र.

ॐ

## भागवत धर्माचें कार्य.

श्रीसंतमुगुटमणि श्रीज्ञानेश्वरमहाजांनीं भागवत सांप्रदायास चालना देऊन महाराष्ट्रधर्म संरक्षणाचें श्रेय घेतलें. "ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया" भागवत सांप्रदायाचे आद्यप्रवर्तक श्रीज्ञानेश्वरमहाराजच होत. श्रीनिवृत्ती ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई व श्रीसंत नामदेवमहाराज यांनीं भरतखंडांत यात्रा मिषानें हिंडून अनेक जीवांना पावन केलें. उत्तर भारतांत पंजाब, सिंध, राजपुताना इत्यादिकडे दिवसेंदिवस आर्यधर्मावर मुसलमानी सत्तेचें आक्रमण होत असलेलें त्यांच्या निदर्शनास आलें. कित्येक रणपूत क्षत्रियांनीं आपल्या पोटचे गोळे मुली नाइलाजानें मुसलमानांच्या राण्या केल्या. राणी पद्मिनी हिला जोहार करण्याची पाळी मुसलमानांच्या भलत्या आकांक्षेमुळें आली. अशी समाजस्थिति पाहून श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचें अंतःकरण कळवळलें व अशा स्थितींत ते यात्रा करून आले.

मुसलमानी सत्तेचा फास महाराष्ट्राचे गळ्यास लागण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. उत्तर भारतांत तर अनेक हिंदु मुसलमान झाले होते. तसा प्रसंग महाराष्ट्रावर न येतां सनातन धर्म कसा टिकेल या विचारानें त्यांनीं जी योजना आखली त्याचेंच नांव भागवत वा महाराष्ट्र धर्म. यावेळीं कर्मठांचें प्रावल्य फार होतें. कर्मांतील दिव्यत्वाचा अनुभव बाजूस राहून कर्मास फक्त कवाइतीचें स्वरूप येत आहे; पापपुण्य, स्वर्ग–नरक यांतच समाज अडकला आहे. कर्मही यथासांग होत नसे व मुसलमानी सत्ता आरूढ झाल्यास सत्कर्मेंही होणें अशक्य होईल हें श्रीज्ञानेश्वरांनीं लक्षांत घेतलें व यापुढें केव्हांही धर्मनाश न होतां जनतेचें कल्याण सहज साधावें व प्रपंच परमार्थ भिन्न नसून एकत्र कसे आहेत. भूतमात्रीं परमात्मा आहे. परमात्माच प्रत्येक वस्तुमानांत कसा पूर्ण आहे अशा तऱ्हेची उदार शिकवण ज्यांत आहे असे श्रीज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टि, हरिपाठ, :विरहिण्यादि अभंग असे ग्रंथ तयार केले. हा भागवत धर्म अमक्या जातीचा, अमक्यासच त्यांत जागा आहे, तमक्यांस त्यांत मज्जाव

आहे असें न करतां 'सकळांसि येथें आहे अधिकार' ही घोषणा केली. त्याचे प्रत्यक्षतेसाठीं सर्वांचें प्रेमरूप दैवत श्रीविठ्ठल, सर्वांचा उत्तम मंत्र रामकृष्णहरी ठरविला. या भागवतधर्मांत ब्राह्मण, क्षत्रियादि चातुर्वर्ण्यांचे लोक असतच पण इतरही सर्व जातींचे लोकांस हा धर्म आपलेजवळ घेत होता. त्यामुळें प्रथम जातिवैमनस्यें दूर झालीं. एकाद्या अस्पृश्यानें हा धर्म स्वीकारला व गळ्यांत माळ ( म्ह. साक्षात् विठ्ठल ) धरली म्हणजे ब्राह्मणही त्याच्या जातीकडे न पहातां त्यामध्यें श्रीविठ्ठल आहे असें समजून नमस्कार करीत असे. यामुळें उच्च-नीच कल्पना मागें पडून समाजस्थैर्यता उत्पन्न झाली व या भागवतधर्माचे अनु-यायी महाराष्ट्रांतील सर्व जातींतील लोक झाले.

श्रीमच्छंकराचार्यांच्या अद्वैत-तत्त्वज्ञानाचा प्रसार झाला होता. त्यावरच सुंदर भक्तिप्रेमाची ध्वजा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं उभारली. या ध्वजेचे जनक श्रीज्ञाने-श्वरमहाराज होते. त्यांची अवतारसमाप्ति फार लवकर झाल्यामुळें त्यांना पुढील दृश्य पाहतां आलें नाहीं. पण त्यांच्या या उच्च दर्जाचे शिकवणीमुळें उच्चनीच भाव मागें पडला. कर्मांतील उच्चनीच अधिकार यांचें वेड कमी होऊं लागलें. हा कित्ता त्यांचेनंतर झालेल्या सकल संतांनीं अक्षरशः पाळला. सर्व जातींत भागवतसांप्रदायी संत निर्माण होऊं लागले. या संतांचे शिकवणीमुळें भागवतधर्म वाढीस लागला. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे समाधीनंतर थोड्याच अव-काशांत महाराष्ट्रांतलि क्षत्रिय घराण्याचें यादवांचें राज्य नाहींसें झालें. क्षात्र-शक्ति नाहींशी झाली कीं, धर्मसंरक्षण होणें दुरापास्त असतें. धर्मसंरक्षणासाठीं धारातीर्थीं प्राण समर्पण करणारे क्षात्रवीर असले तरच धर्मरक्षण; नाहीं तर त्या अभावीं धर्माचीं शकलें होतात असा अनुभव आहे. महाराष्ट्रांतील क्षात्रशक्ति निर्मूल झाली. यादवांचे राज्यभंगानंतर तीनशें वर्षें महाराष्ट्रांत क्षत्रियांची तरवार चमकत नव्हती. पण अशा वेळीं या भागवतधर्मीय संतांनीं भागवत-धर्माचीं तत्त्वें समाजांत बुडापासून शेंड्यापर्यंत पसरविलीं. त्यामुळें महाराष्ट्र-जनता धर्महीन झाली नाहीं. मुसलमानी सत्ता होती; पण त्यांना महाराष्ट्रांत मुसलमानी पंथ वाढवितां आला नाहीं. हें फक्त या संतांच्या शिकवणीचें दृश्य होय. याच भागवतधर्मांतूनच श्रीसमर्थ रामदासस्वामी, श्रीरंगनाथस्वामी, श्रीजयरामस्वामी, श्रीकेशवस्वामी भागानगरकर व श्रीआनंदमूर्ति ब्रह्मनाळकर हें पंचायतन निर्माण झालें व या ब्राह्मशक्तीचे पंचायतनास श्रीमच्छत्रपति

श्रीशिवाजीमहाराज हें क्षात्रशक्तीचें अनुकूल स्थान मिळतांच हिंदुधर्मसंस्थापना होऊन महाराष्ट्र आनंदवनभुवन झालें.

प्रस्तुत ज्यांचें चरित्र पुढें येत आहे ते श्रीशांतलिंगप्पामहाराज हे लिंगायत होते, पण त्यांचेवर भागवतधर्मीय संतांचे सहवासाचा परिणाम उत्कृष्ट झालेला होता; किंबहुना या स्वामींमुळें भागवतधर्मासही उज्वलता आली होती हें त्यांच्या चरित्रावरून व त्यांच्या ग्रंथावरून दिसून येणारें आहे.

## शिंगणापूर व भोसले

सातारा जिल्ह्याचे पूर्वेस एका पहाडावर शिखरशिंगणापूर हें उत्कृष्ट क्षेत्र आहे. तेथील श्रीशंकराचीं दोन मंदिरें पुरातन आहेत. त्या मंदिरांचा जीर्णोद्धार राजा सिंघण यादव ( शके ११३२–११६० ) यानें केला आहे व तेथील स्थानास सिंगणापूर हें नांव ठेविलें. या महादेव–शिवलिंगांत हरिहरांचें ऐक्य अनुभवण्यास मिळतें. एकाच पिंडीवर दोन लिंगें असून एकावर बेल व एकावर तुलसी वाहण्याचा संप्रदाय आहे. शिव व विष्णु हा नाममात्र भेद असेल; परंतु हीं दैवतें भिन्न नसून एकच आहेत, हें अपूर्व दृश्य येथें दृष्टोत्पत्तीस येतें व याच देवतांमुळें शैव–वैष्णवांचे भेद नाहींत, असतील तर ते कृत्रिम व मनुष्यांचे दुराग्रहाचे आहेत असें सहज वाटतें.

हा शंभुमहादेव देव क्षात्रकुलावतंस श्रीमच्छत्रपति शिवाजीमहाराज यांचें कुलदैवत आहे. भोसले घराण्याप्रमाणेंच बृहन्महाराष्ट्रांतील अनेकांचें हा देव कुलदैवत आहे. लग्न झाल्यानंतर या देवास वधूवरांनीं जाण्याचा सांप्रदाय आहे. येथें महाशिवरात्रीस यात्रा भरते, पण त्यापेक्षांही चैत्र शु. १५ ची यात्रा फारच अफाट असते. दोन लाखांपर्यंत यात्रा या १५ दिवसांत सहज येते. गोव्यापासून नागपूरपर्यंत तसेंच मोगलाईंतील मराठवाड्यांतील पुष्कळच यात्रा येत असते.

---

१ सिंघणदेव उर्फ सिंहलदेव हा महाप्रतापी होता. 'प्रौढप्रताप चक्रवर्ती, पृथ्वीवल्लभ, यादवचक्रवर्ती, समस्तभुवनाश्रय' इ. बिरुदें त्यानें धारण केलीं व तीं त्यास साजत होतीं. हेमाद्रीनें त्याचें वर्णन मोठें मार्मिकपणें केलें असून त्या वर्णनास पुष्टि देणारे ५० प्राचीन लेख उपलब्ध झाले आहेत.

तस्मादभूदभिनवस्मर चारुमूर्तिः कीर्तेः पदं स किल सिङ्घणदेवभूपः ।
उदण्डदोर्युगलगर्वितवैरिवीर–सीमन्तिनी वदन कैरव चण्डभानुः ॥

पहाडावर शहाजीराजे, शिवाजीमहाराज व संभाजीराजे यांच्या समाधी आहेत.

शिवाजीमहाराजांचे आजे मालोजी ( श. १४७४-१५४२ ) हे जेव्हां शिंगणापुरास आले तेव्हां शांतलिंगप्पामहाराज तेथें होते. मालोजीची पत्नी दीपाबाई, ही फलटणच्या निंबाळकरांची मुलगी, बरोबर होती. या मालोजीराजांनीं शिंगणापूर येथें सुमारें ४० एकर एवढें मोठें विस्तीर्ण तळें उत्तम बांधवून जीर्णोद्धार केला आहे. शहाजीराजांच्या जवळ असलेल्या जयरामकवीनें शहाजीस शिसोदे स्पष्ट म्हटलें असून मालोजीविषयीं त्याचे उद्गार असे प्रसिद्ध आहेत. ' महीच्या महेंद्रांमध्यें मुख्य राणा । ( दि ) लीपास त्याचे कुळीं जन्म जाणा ॥ तयाचे कुळीं माल भूपाल ज्याला । जयानें जळें शंभु संपूर्ण केला ' ॥ म्ह० पृथ्वीवरील राज्यांत प्रमुख जो उदेपूरचा राणा त्याचे घराण्यांतील दिलीपसिंह याचे कुळांत मालोजीराजे यांचा जन्म झाला व त्यांनीं शंभुमहादेवाच्या डोंगरावर पाण्याचा उत्तम तलाव बांधला. मालोजीचे पूर्वी हा तलाव होता पण तो व्यवस्थित नव्हता. त्यास चहुफेर बांधून त्यास उत्तम स्वरूप देण्याचें कार्य मालोजीराजांनीं केलें. शिखरशिंगणापूर येथील बडवे घराण्याचे पूर्वज श्री हणगोजी ऊर्फ हनुमानस्वामी हे असून त्यांनीं शंभुमहादेवाजवळ क्षेत्र वसविलें अशी आख्यायिका आहे. शंभुमहादेवाजवळ वस्ती हनुमानस्वामीकृत आहे. तेथून उत्तरेस खालीं अर्ध्या मैलावर शिंगणापूर गांव त्या पूर्वीचें आहे. हनुमानस्वामी शांतलिंगप्पापेक्षां थोडे वडिल आहेत. या वेळीं विजापूरकर आदिलशाहीची सत्ता होती.

सिंगणराजानें बांधलेल्या शंभुमहादेवाच्या देवालयाचा जीर्णोद्धार बसवंतराव खोजा यानें केल्याचें प्रसिद्ध आहे. येथें एक शिलालेख आहे.

अशा या शुद्ध, पवित्र व रम्य आणि जेथें हरिहरांचें अभेदत्व प्रत्यक्ष आहे अशा क्षेत्रांत शांतलिंगप्पांचा आविर्भाव झाला. शांतलिंगप्पाचें चरित्र समग्र समजावें म्हणून पुष्कळ प्रयत्न करूनही फायदा झाला नाहीं. त्यांचें हस्तलिखित चरित्र शिंगणापूर येथें नुकतेच कालवश झालेले बापू वाणी यांजकडे होतें असें समजल्यावरून तेथें समक्ष जाऊन तपास केला. तें चरित्र दहिवडीस मलवडीकरांचे मठांत गेल्याचें समजलें. तेथेंही तपास झाला. शेवटीं चरित्र नाहीं असें मठांतील बोवांनीं सांगितल्याचें पत्र श्री. आण्णासाहेब भिडे शिंगणापूरकर यांचें आलें ! नाइलाजास्तव जेवढी माहिती मिळते तेवढयावरच निर्वाह

करण्याचें ठरविलें आहे. भक्तमंजरीमध्यें बाराव्या अध्यायांत जयरामस्वामींचे गुरु कृष्णाप्पा यांचें चरित्र आहे. कृष्णाप्पाचे गुरु शांतलिंगप्पा म्हणून त्यांत त्यांचें अल्पसें चरित्र आलें आहे.

१ मालोजी हा यादववंशांतील क्षत्रिय होता. त्यांचें दैवतही शंकर होय. मालोजीराजे व देवगिरीचे यादव यांचा शरीरसंबंध होता. लुकजीराव जाधव, देवगिरीकर यांची कन्या जिजाबाई शहाजीराजे भोसले यांस दिली होती. या पूज्यपवित्र मातेचे पोटींच श्रीशिवाजीमहाराज जन्मास आले. त्यांनीं मातृकुळांतील क्षात्रतेज कमी होऊन राज्यभंग झाल्याचें पाहून या क्षात्रकुलावतंस मुलीच्या सुपुत्रानें हिंदवी स्वराज्य व धर्मसंस्थापना केली. यादवांचेंच कार्य शिवाजीमहाराजांनीं पूर्णतेस नेऊन क्षात्रशक्ति उज्वल केली व महाराष्ट्रधर्मध्वजा उंच फडकाविली.

२. सातारा ग्याझिटिएरमध्यें पुढील उल्लेख आहे. ( सिंघणनें ) बांधलेलें देऊळ हेमाडपंती असावें. त्याची दुरुस्ती श्रीछत्रपति श्रीशिवाजीमहाराजांनीं केली आहे. दगडी काम उत्तम ३०० वर्षांपेक्षां जुनें असावें. हल्लींच्या पद्धतीप्रमाणें कोपऱ्यांचे दगड आहेत. दुसरें बळीमहादेवाचें मंदिरही हेमाडपंतीच आहे.

शिंगणापूर अक्षांश १७५० वर व रेखांश १४७२ आहे. यांतील पहिली मोठी वेस धनगरानें बांधली आहे व दुसरी शिवाजीमहाराजांनीं बांधली आहे. दुसरी पाहून त्याप्रमाणें धनगरानें बांधली आहे. शिवाजीनें बळवंतराव यास तेथें नेमून त्याचे देखरेखीखालीं देऊळ बांधलें. देवळाचे गाभ्यावरील शिखर ६० फूट उंच आहे. या स्थानाची उंची समुद्रसपाटीपासून ३०४९ फूट आहे.

श्रीसमर्थपंचायतनांतील श्रीजयरामस्वामी वडगांवकर यांचे आजे गुरु शांतलिंगप्पा होत. जयरामस्वामींच्या मठांत हल्लीं असलेले मठाधिपति श्रीकृष्णबोवामहाराज यांनीं परंपरेच्या माहितीवरून सांगितलेली हकीगत येथें देत आहें. त्यावरून शांतलिंगप्पा केवढे अधिकारी महात्मे होते हें निदर्शनास येण्यासारखें आहे.

## जन्म व बालपण

नामदेवमहाराज व कबीरमहाराज हे जसे अयोनिसंभव आहेत तसेच शांतप्पाही आहेत अशी एक दंतकथा आहे.

खरी गोष्ट ही दिसते. श्रीजयरामस्वामींच्या बखरींत त्यांचा थोडासा उल्लेख

आहे. सिंगणापूरचा एक लिंगायत सुखवस्तु श्रीमंत होता. तो पुत्रहीन असल्यामुळें त्यानें अनेक व्रतें, तीर्थें, नवससायास, श्रीशंभुमहादेवाचें आराधन इ० केल्यावर श्रीशंभुमहादेवांनीं त्याला दृष्टांत दिला व तुला यात्रेंत पुत्र सांपडेल, असा वर दिला. त्याप्रमाणें हा श्रीमंत काशीयात्रा करीत असतां कांहीं थोडया दिवसांपूर्वी जन्मास आलेलें मूल त्याला गंगातीरीं दिसलें. मूल सतेज होतें. त्याचें रक्षण कसें होत होतें हें समजण्यास मार्ग नव्हता. मूल सुंदर आहे असें पाहून त्यानें उचलून घेतलें व श्रीमंताच्या पत्नीनें त्यास मांडीवर घेतांच प्रेमपान्हा सुटला व तिनें नंतर त्यास स्तनपान दिलें व त्या मुलास शिंगणापुरास आणलें. तो आजानुबाहु होता. या लिंगायतानें व त्याच्या पत्नीनें या बालकाचें पालनपोषण केलें. हें बालक बिलकूल रडत नसे, कशाचाही हट्ट करीत नसे. त्याची ही माता दूध पाजील तेव्हां प्यावें नाहीं तर स्वस्थ पडून राहावें. ही त्याची शांत स्थिति पाहून त्याचें नांव शांता ठेविलें. या जंगम लिंगायतानें त्याचा प्रतिपाळ केला म्हणूनच शांतप्पास जंगम लिंगायत म्हणावयाचें. एरव्ही ते जातिनिरपेक्ष होते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं व पुढील त्यांचे चरित्रावरूनही हेंच दिसून येतें.

## गुरुदर्शनाची तळमळ

शांताचे लहानपणाचे खेळ म्हणजे तळ्यांत स्नान करावें, सर्वांगाला विभूतीचें लेपन करावें, बेलफुलें घेऊन श्रीमहादेवाची पूजा करावी, व सतत ‘ शिवहर शंकर नमामि शंकर शिव शंकर शंभो ! हे गिरिजापते भवानीशंकर शिव शंकर शंभो ’ हें भजन करीत असावें. बरोबरच्या मुलांत खेळतांनाही त्या मुलांना शिवभजन करावयास लावीत असत. घरांत फक्त जेवण्यापुरतें असावें. बाकी सर्व वेळ राममंदिरांत व अरण्यांत फिरत असावें. कांहीं थोडया वेळांत तर त्यांचें वैराग्य कडकडीत दिसूं लागलें. अरण्यांत शंकरा, शंकरा असा टाहो फोडावा, दोन दोन दिवस घरीं येऊं नये. अन्नाची, वस्त्राची क्षिति बाळगूं नये. कोणी घरीं चल म्हटलें तर मला जेथें शंकर भेटेल तेंच माझें घर आहे असें सांगावें. पालक पित्यानें मोठा अट्टाहास करून घरीं नेलें तरी लगेच बाहेर पडून जंगलांत जाऊन शिवध्यान करीत असावें. या कालांत त्यांना तितिक्षा चांगलीच बाणली. थंडी, ऊन, वारा, पाऊस, तसेंच रात्रीं व दिवसाही जंगलांत एकटें असतांही हिंस्रपशूंची भीति होत नसे.

' सहनं सर्वदु:खानामप्रतिकारपूर्वकं '

भूक, तहान वगैरेपासून बाधा होईनाशी झाली. आतां माझी गुरुमाय भेटून मला साक्षात् परब्रह्म आदिनाथ शंकराचें दर्शन कसें होणार यामुळें रात्रंदिवस मनाला व्यग्रता येऊन चैन पडत नसे.

संसारबंधनिर्मुक्तिः कथं स्यान्मे कदा प्रभो ।
संसारबंधापासूनि सुटे देवा कसा कधीं । "

अशा तऱ्हेनें तीव्र मुमुक्षुत्व बाणलें. शिंगणापूर येथें गुप्तलिंग म्हणून अतिशय रमणीय एकांत स्थल आहे. ती जागा तपश्चर्येस व ध्यानास अत्यंत योग्य आहे.

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ भ. गीता अ. ६।११

यावरलि श्रीज्ञानेश्वरमहाराजांची टीका मुद्दाम देत आहें.

तरी विशेषें आतां बोलिजेल । परि तें अनुभवें उपेगा जाईल ॥
म्हणोनि तैसें एक लाभेल । स्थान पाहावें ॥ १६३ ॥
जेथ आराणुकेचेनि कोडें[३] । बैसलिया उठों नावडे ।
वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया ॥ १६४ ॥
जो संतीं वसविला ठावो । संतोषासी सावावो ॥
मना हो उत्सावो । धैर्याचा ॥ १६५ ॥
अभ्यासुनि आपण यातें करी । हृदयातें अनुभव वरी ।
ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ॥ १६६ ॥
जया आंड जाता पार्था । तपश्चर्या मनोरथा ।
पाखांडियाहि आस्था । समूळ होय ॥ १६७ ॥
स्वभावें वाटे येतां । जरी वरपडी जाहला अवचिता ॥
तरि सकामुही परि माघौता । निघों विसरे ॥ १६८ ॥
ऐसेनि न राहत यातें राहवी । भ्रमतयातें बैसवी ।
थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥ १६९ ॥
हें राज्य वर सांडिजे । मग निवांत एथेंचि असिजे ।

---

१. अभ्यासानें. २. करमणुकीचें ३. हौसेनें; सुखानें ४. साहाय्य ५. वाजूनें ६. फिरणाराला ७. उठवी, जागें करी.

ऐसें शृंगारियासही उपजे । देखतखेवों ॥ १७० ॥
जे येणें मानें बरवंट । आणि तैसेंचि अतिचोखट ॥
जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥ १७१ ॥
आणिकही एक पाहावें । जें माधकीं वसतें हो आवें
आणि जनाचेनि पायरवें । रुळेचिना ॥ १७२ ॥
जेथ अमृताचेनि पाडें । मुळाही सकट गोडें ।
जोडती दाटें झाडें । सदा फळती ॥ १७३ ॥
पाउला पाउला उदकें । वर्षाकाळावीण अति चोखें ॥
निर्झरें[10] कां विशेखें । सुलभें जेथ ॥ १७४ ॥
हा ऑतपुही अळुमाळु । जाणिजे तरी शीतळु ॥
पवनु अति निश्चळु । मंद झुळके ॥ १७५ ॥
वहुत करूनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद ।
शुक हन षट्पद । तेउते नाहीं ॥ १७६ ॥
पाणिलेंगें हंसें । दोनी चारी सारसें ॥
कवणें एके वेळे वैसे । तरी कोकिळ ही होका ॥ १७७ ॥
निरंतर नाहीं । तरि आलीं गेलीं कांहीं ।
होतु कां मयूरेंही । आम्ही ना न म्हणों ॥ १७८ ॥
परि आवश्यक पांडवा । ऐसा ठाव जोडावा ॥
तेथ निगूढ मठ होवावा । का शिवालय ॥ १७९ ॥
दोहीं माजि आवडे तें । जें मानणें होय चित्तें ॥
वहुतकरूनि एकांतें । वैसिजे गा ॥ १८० ॥
म्हणोनि तैसें तें जाणावें । मन राहतें पाहावें ।
राहेल तेथ रचावें । आसन ऐसें ॥ १८१ ॥
वरी चोखट मृगसेवडी । माजी धूतवस्त्राची घडी ।

---

१ शृंगारांत रमलेल्यांनाही. २. पाहिल्या बरोबर. ३ चांगलें. ४ शुद्ध. ५ ब्रह्मस्वरूप. ६ वस्ती केलेली. ७ वर्दळ. ८ मळेना. ९ आढळती. १० झरे. ११ ऊन. १२ थोडें. १३ जनावर. १४ अथवा. १५ भ्रमर. १६ जुजवी. १७ बदकें. १८ चक्रवाकपक्षी. १९ असोत. २० गुप्तस्थान. २१ कृष्णाजिन.

तळवटीं आमोडी । कुशांकुर ॥ १८२ ॥
सकोमळ सरिसे । सुवद्ध राहती आपैसे ।
एकपाडें तैसें । बोजा घालीं ॥ १८३ ॥
परि साविंयाचि उंच होईल । तरि अंग हन डोलेल ।
नीचं तरी पावेल । भूमिदोषं ॥ १८४ ॥
म्हणोनि तैसें न करावें । समभावें धरावें ।
हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥ १८५ ॥

एवढा लांब उतारा देण्याचें कारण वर वर्णिल्याप्रमाणें गुप्तलिंगाची जागा आहे. हल्लींही तेथें जाणारांचें मन सहजच रमतें. अशा उत्तम व प्रशांत ठिकाणीं शांतप्पा नामस्मरण करीत प्रभूची प्रार्थना करीत असत. श्रीशंकरा, तुझ्या दर्शनावांचून माझे प्राण तळमळत आहेत. तूं दयाळू सर्वेश्वर आहेस असें तुझें वर्णन वेद, श्रुति, संतमहंतादिकांनीं केलें आहे. महानंदेसारख्या योषितेवरही आपण कृपा केली, तिचे दोषाकडे पाहिलें नाहीं. निरनिराळे अवतार घेऊन ध्रुव, प्रल्हाद, उपमन्यादिकांना दर्शन देऊन पूर्णतेचे पुतळे बनविलें. अजामिळासारख्या महापाप्याचेंही पाप आपण लक्षांत न घेतां त्याचेवर कृपा केली. अनेक जीवांना आपण सुखसंपन्न केलें आहे. त्याबद्दल श्रुतिशास्त्रें, पुराणेतिहासांची गर्जना आहे, पण माझेविषयींच निष्ठुरता कां धरली आहे ? तुम्ही निष्ठुर असणें शक्यच नाहीं. आपण सर्व जगताचे मायबाप आहांत; तेव्हां मजसारख्या दीन लेकरावर आपली मातेसारखी कृपा असावयास पाहिजे. आपण माझे हृदयांत आहांत असें शास्त्रें व संत सांगतात. पण माझ्या हृदयांत राहून माझ्या सकलेंद्रियांतून अखिल कर्मरूपानें आपणच प्रगटतां, तर मग मला आवडत आहे अशा माझ्या गुरुमाउलीचे रूपानें आपणांस प्रगट होण्यास काय जड पडणार आहे ? चातकाची तृषा ती किती असणार ? त्याप्रमाणें मज चातकाची तृषा पूर्ण करणें आपणांसारख्या मेघास मुळींच अशक्य नाहीं. तरी माउले ! आतां तुझा वियोग एक क्षणभरही सोसवत नाहीं. आतां जर दर्शनास विलंब झाला तर माझे प्राण देहांतून जातील. मग तुमच्या दर्शनाचा कोणास उपयोग होईल ! अशा प्रकारें नित्य तळमळत असावें. अशा प्रकारें कांहीं दिवस गेल्यावर एक सोन्याचा दिवस उगवला.

---

१ साग्र. २ दर्भ. ३ व्यवस्थित रीतीनें. ४ कदाचित्. ५ सखल. ६ गारठा, वाळवी इ०.

## शिव-गुरुदर्शन.

श्रीगुप्तलिंगाची पूजा करून शांतप्पांनीं शंकराचे पिंडीस कवटाळलें व प्रभो, आज मला आपलें दर्शन देणार नाहीं तर आतां शेवटपर्यंत असाच येथें बसून प्रायोपवेशन करीन. शांतप्पा देहभानविवर्जित झाले. तों कोणी तरी उचलून पोटाशीं धरलें आहे व 'शांता शांता' असा शब्द उमटत आहे. शांतानें डोळे उघडून पाहिलें, तों सर्वेश्वर उभे असून शांतास म्हणाले, शांत, "तुझेकडून अनेक जीवांना भक्ति–ज्ञान–प्रेमाचा मार्ग समजून ते कृतार्थ होतील. माझें नांव नीलकंठ आहे. असें सांगून 'ॐ नमः शिवाय' हा उघडा तारकमंत्र सांगितला. शांतानें परंपरा विचारतांच आदिनाथापासून मी एकूणपन्नासावा आहें. असें सांगितलें.

### परंपरा

ती परंपरा श्रीजयरामस्वामीकृत शांतिपंचीकरण. या ग्रंथांत दिली आहे; ती अशीः—( शांतिपंचीकरण अ. ३५ )

शिष्य ह्मणे श्रीगुरुराया । मागें मठमान्य वर्णिलें पाहे ।
शांतमठांचा निर्णय । समन्वय निवडुनी सांगा ॥ १ ॥
श्रीगुरु ह्मणती शिष्यास । प्रभुपंचमहासिद्ध पुरुष ।
त्याणें केले चौघे शिष्य । चहूं दिशांस स्थापिले ॥ २ ॥
पंचकलश पूजा अपूर्व । मध्य मेरु– मंडलभाव ।
विंध्याचल कलश पूर्ण । तेथें सदाशिव मुख्य आचार्य ॥ ३ ॥
पश्चिम गंधमादन कलश । ईश्वर तेथील आचार्य परिस ।
उत्तरे हेमाद्रि कलश विशेष । महेश्वर आचार्य तेथील ॥ ४ ॥
महेंद्र कलश स्थापिला दक्षिणें । तेथें आचार्य महारुद्रजाण ।
तेथील देव–तीर्थ पूर्ण । करूं वर्णन तयाचें ॥ ५ ॥
विंध्याद्रि मठीं श्रीविद्यादेवी । विश्वलिंग देवस्वभावी ।
विश्व उद्धार तीर्थ ठेवी । विश्वपालन क्षेत्र नाम ॥ ६ ॥
गंधमादन पश्चिम मठीं । गदाधरी देवी गोमटी ।
गवेश्वर गोमती गंगातटीं । वसे गौरव मंगळक्षेत्र ॥ ७ ॥
हिमाद्रिमठ जाण उत्तरे । तेथें देव हिमकेदार ।
भागीरथी तीर्थ क्षेत्र । सर्व पावन देवी पार्वती ॥ ८ ॥

महेंद्रमठ तो दक्षिणें । दक्षिण समुद्र तीर्थ जाण ।
दक्षिणामूर्ति देव पूर्ण । दाक्षायणी आदिशक्ति ॥ ९ ॥
सर्व पापहारक क्षेत्र म्हणती । हे शांतमठाची विरपत्ती ।
सांगितली तुजप्रती । संशयग्रंथी छेदावया ॥ १० ॥
विंध्याचल मठीं भेद । दिव्य लिंग शोभे शुद्ध ।
गंधमादनमठीं भेद । यजुर्वेद जंगमलिंग ॥ ११ ॥
हिमाद्रिमठीं वेद साम । प्रसादलिंग महाउत्तम ।
महेंद्रमठीं अथर्वणनाम । शिवलिंग सौम्य वसताहे ॥ १२ ॥
सूक्ष्म वेद मेरुमठीं । महालिंग तेथील हतवटी ।
आतां शांतपरंपरा गांठी । देऊं शेवटीं अवधारा ॥ १३ ॥
प्रभुपंचमहासिद्धेश्वर । सांगूं तयाचा विस्तार ।
सदाशिव–ईश्वर–महेश्वर । महारुद्र चार मठीं ॥ १४ ॥
घटाकारण, शंखाकारण, । काळांतक, सर्वानुग्रह, अलजण ।
महाकर्तृमूर्ति, अनुग्रहेश्वर, दोन । सर्वसाक्षी, सर्वाचार्य, पूर्ण हे वारा ॥१५॥
रेवणसिद्ध, मराळसिद्ध । येकोराम पंडिताराध्य ।
षोडश झाले पुढें भेद । ज्ञानी सावध परिसावें ॥ १६ ॥
धर्म, इंद्र, रुद्र मुनींद्र । मुक्त–मुनी समाधि सोमेश्वर ।
विंशति झाले विस्तार । ऐक सादर सच्छिष्या ॥ १७ ॥
वन सदाशिव एकविसावा । चतुर्दश विद्यापारंगत वाविसावा ।
रेवणाचार्य मल्लिकार्जुन गणावा । चतुर्विंशति पर्यन्त ॥ १८ ॥
षडगद शीव वसवेश्वर भाळलोचन । धातुर्वादी अठ्ठावीस जाण ।
वदरीकांतचन मल्लिकार्जुन । गंगाधर एकतीस ॥ १९ ॥
सिंगळसिद्ध निराहारासिद्ध । समाधि सिकू शांत सोमेश्वर प्रसिद्ध ।
हुल्लिकांती चन्नवीर चल्लूर शांत वंद्य । विद्यापारंगत अडतीस हे ॥२०॥
शांत वोध शांतेश्वर । सुखवोध पूर्ण वोध निर्धार ।
वसवलिंग शांतलिंग सधर । दशरथ शांत पन्नास हे ॥ २१ ॥
हे शांत परंपरावर्णन । समूळ काथिलें तुजलागून ॥
कांहीं न करोनि अनुमान । ग्रंथपठणें सादर होई ॥ २२ ॥

चार मठ एक सांप्रदाय । एकापासूनि अनेक पाहे ।
अनेकीं एकरूप होये । निर्गुण सगुण अभेदत्व ॥ २३ ॥
अभेदीं भेद भक्तिमूळ । निर्गुणीं साधकांचें चित्त चळे ।
ह्मणऊनि हे सगुण सुढाळ । झाला विमल श्रीशांत ॥ २४ ॥
शांतत्वा येऊनि भजन करी । त्यास अनेक हरी ।
पिंड प्रकृतीचे लहरी । उठे हे कुसरी रचियेली ॥ २५ ॥

याप्रमाणें शांतास आपली परंपरा सांगितली, व मी एकूणपन्नासावा असून पन्नासावा आहेस असें सांगितलें.

आतां परमार्थप्रपंचांत, सर्व आश्रमांत, सर्वावस्थेंत, सर्वगुणांत, चराचरांत इचैतन्यांत एकीएक आदितत्त्व आहे. प्रभुवांचून अन्य कांहींच नाहीं. त्या बोधावर राहून आपला व अनेक जीवांचा काळ आनंदात्मक करशील असा झा तुला पूर्ण आशीर्वाद आहे. शांतांनीं पायांवर मस्तक ठेविलें. इतक्यांत प्रभु दृश्य झाले.

हा अपूर्व सोहळा अनुभवून प्रेमभरानें शांतानें कित्येक वेळ सद्‌गदितपणें अश्रु ाळावेत असा प्रकार वारंवार होऊं लागला. शांताचें शरीर शिवप्रेमानें भरून लें. शरिरांतील सर्वावयवांतून शिवप्रेम दरदरूं लागलें. अखंड ॐ नमःशिवाय या मंत्राची गर्जना करीत असावें.

## तीर्थयात्रा व संतसहवास

यानंतर शांतप्पांनीं राहण्यासाठीं उमावनांत लहानशी पर्णकुटिका केली. ही सुमारें १०० एकर जागा वडव्यांच्या मालकीची आहे. या जागेंत दरसाल मोठी यात्रा भरत असते. या जागेचा सरकारसारा ज्याचेकडे गांवचें वसुलीचें साल असेल तो वडवे भरीत असतो. शांतप्पाचे अंगीं समत्व वाणल्यामुळें त्यांना आपली व दुसरी अशी जात नव्हती. ते अजातशत्रु होते. यानंतर त्यांनीं तीर्थ-यात्रेनिमित्त पर्यटण केलें. त्यांना अनेक साधुसंतांचीं दर्शनें व सहवास झाले. दौलताबाद येथें श्रीजैनार्दनस्वामींची भेट झाली. एकदां श्रीजनार्दनस्वामीही शिंगणापुरास आले होते व ते दुसरीकडे न राहतां शांतप्पाचे मठांत राहिले होते. जनार्दनस्वामी श्रीदत्तोपासक असून भागवतधर्मीय होते. पण शांतप्पा-सारखा पंथजातिनिरपेक्ष महात्मा पाहून ते शैव होते तरी त्यांचे मठांत उतरून कांहीं दिवस तेथें वास्तव्य केलें. नित्य अनेक वेळ व बराच काळ हे उभयतां

संतमूर्ति एकांतांत बसून उत्कृष्ट चर्चा करीत असत. खरेंच आहे कीं, ' मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च '

चित्तें मींचि झालें । मियांचि प्राणे धाले ।
मग जीवो मरो विसरले । बोधाचिया भुली ॥
मग तया बोधाचेनि माजे । नाचति संवाद सुखाचिये आजें ॥
आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचिवरी ॥
जैसीं जवळकेचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें ।
मग तरंगासी धवळारें । तरंगचि होती ॥
तैसी येरयेरांची मिळणी । पडत आनंद कल्लोळांची वेणी ॥
तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥

या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वर्णनाप्रमाणें श्रीजनार्दनस्वामी व श्रीशांतप्पा यांच्या सहवासाच्या स्वानंदाचा सुगंध अत्यंत सुटून तेथील लोकांना अप्रतिम सुख घेतां आलें.

श्रीमंत मालोजीराजे भोसले आपल्या दीपाबाई पत्नीसह आल्या वेळीं त्यांनींही अत्यादरपूर्वक शांतप्पाचें दर्शन घेतलें. शांतप्पांनीं त्यांस नारळ, प्रसाद दिला व तुमचेवर श्रीशंभुमहादेवाची कृपा आहे, त्यांचे व श्रीतुळजामातेचे कृपेनें आपल्या या पुण्यमय वंशांत धर्मसंस्थापक राजा लवकरच येऊन कुल व वसुंधरा पावन करील असा शुभाशीर्वाद दिला.

भागवतधर्मास चालना देऊन जनतेचीं अंतःकरणें परमात्मभक्तिप्रवण केल्यामुळें जातीबद्दलचा दुराग्रह कमी होत चालला. हें कार्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सुरू केलें तें त्यांचे पश्चात् नामदेव, जनाबाई, परिसा भागवत, विसोबा खेचर, गोरा कुंभार, नरहरी सोनार, सांवता माळी, सेना न्हावी, कान्हु पाठक, जगमित्र नागा, जोगा, परमानंद व चोखोबा महार या संतमंडळींनीं जोरांत चालविलें. सर्वच जातींत हे संत निर्माण झाले. त्यांच्यांत कांहीं स्त्रियाही होत्या. जनाबाई, मुक्ताबाई-प्रमाणेंच चोखोबाची स्त्री सोयरा व बहीण निर्मलाबाई महारीण याही भागवत-धर्मीय कार्यकर्त्या होत्या.

या सकल वैष्णववीरांनीं आपल्या अतुल भक्तिभावानें एकमेकांत सख्य उत्पन्न केलें. जाति जरी असल्या तरी परमात्मदृष्टीनें भेदास जागा नाहीं हें सर्वांस वाटलें होतें. नरहरी सोनारासारखा शिवभक्त व नामदेवासारखा वैष्णव-

वीर पण त्यांच्यांत शैव-वैष्णवांबद्दल विलकूल तंटे नसून ते आत्मीयतेनें राहात असत. त्याचा परिणाम हिंदुसमाजावर होऊन हिंदुसंघटन अप्रतिम झालें. प्रमुख संतांचें कार्य जनतेपुढें आहे. तें देऊन जागा अडवीत नाहीं. पण दोन अनामिक स्त्रियांचे दोन अभंग देऊन वरील विधान स्पष्ट करतों.

चोखोवाची स्त्री सोयरावाई इचा अभंगः—

नाहीं उरली वासना । तुम्हां नारायणा पाहतां ॥ १ ॥
उरला नाहीं भेदाभेद । झालें शुद्ध अंतर ॥ २ ॥
विटाळाचें होतें जाळें । तुटलें वळें नामाच्या ॥ ३ ॥
चौदेहाची तुटली दोरी । ह्मणे चोखयाची महारी ॥ ४ ॥

चोखोवाची वहीण निर्मळावाईचा अभंग.

मज नामाची आवडी । संसार केला देशधडी ॥ १ ॥
सांपडलें वर्म सोपें । विठ्ठल नाम मंत्र जपे ॥ २ ॥
नाहीं आणिक साधन । सदा गाय नारायण ॥ ३ ॥
निर्मळा ह्मणे देवा । छंद येवढा पुरवावा ॥ ४ ॥

अशी उच्च दर्जाची संघटनाची दृष्टि या वैष्णववीरांची होती. श्रीशांतप्पा-महाराजांचे समकालीन श्रीजनार्दनस्वामी, श्रीसंतवर्य श्रीएकनाथमहाराज, जनी, जनार्दन, मोरया गोसावी, विष्णुदास नामा, महालिंग दास, रंगनाथ मोगरेकर, माधवदास, सुप्रसिद्ध दत्तभक्त दासोपंत इत्यादि होते. त्यांच्या व शांतप्पा-महाराजांच्या गांठीभेटी होणें अशक्य नव्हतें. पंढरीस जाणारे वैष्णववीर शिंगणापूर महादेवाचे दर्शनास जात असत. पंढरपूर व शिंगणापूर यांत अंतर सुमारें २५ कोसांचें असावें.

## समत्व

शांतप्पा हे शिवयोगी होते. त्यांचा दीक्षाविधि लिंगायत पंथानुसार होऊन त्यांचेवर लिंगायत धर्माचे उत्कृष्ट संस्कार झाले होते. त्यांना संस्कृत उत्तम येत असावें, हें चनवसवेश्वराचे सूत्रावर त्यांनीं टीका केल्यामुळें सहज दिसतें. शांतप्पा यांच्या जातीवद्दलचा विचार करणें अप्रस्तुत होय. तरीपण त्यांचें लहानपण लिंगायताचे घरीं गेल्यामुळें ते सहजच शैव-शिव भक्त झाले. लिंगायत हे अगदीं कट्टर शिवभक्त असतात. शैव व वैष्णव यांच्यांत अत्यंत विरोध

असतो तो आजही अनुभवास येत आहे. पण श्रीशांतलिंगाप्पा हे शिव व विष्णु या दोन्ही देवतांना एकाचींच रूपें मानीत असत. त्यामुळें ते शैवांस व वैष्णवांस सारखेच प्रिय असत. ज्या क्षेत्रीं शांतप्पाचा अवतार झाला त्या महादेव क्षेत्रांतील शिवलिंग हरिहरात्मक आहे हें वर एके ठिकाणीं दिलेंच आहे. त्या हरिहरात्मक पूजेचा परिणाम शांतप्पासारख्यावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. शिवाय भागवतधर्मीय संतांच्या सहवासामुळें भेदाची दृष्टि नाहींशी होऊन संपूर्ण जग अविनाशी परमात्म्याचा चिद्विलास आहे अशी त्यांची उच्चतर भावना झाली. शांतप्पा अगदीं शांतिमय असत. ते त्रिकाळ शिवपूजन करीत असत. त्यांच्याकडे येणाऱ्या मुमुक्षूंना त्यांच्या आवडीप्रमाणें शिवाची अथवा विष्णूची भक्ति करण्याला सांगून त्यांना सन्मार्गास लावीत असत. त्यांच्या मठांत लिंगायतांचें स्वयंपाकपाणी एका बाजूस व ब्राह्मणादिकांचें स्वयंपाकादि दुसऱ्या बाजूस असे. ज्यानें त्यानें आपल्या धर्माप्रमाणें चालून सर्व पंथांच्या लोकांशीं भगवद्भावानें वागावें असें ते सांगत असत, त्यामुळें हजारों लोक त्यांना शरण येत व त्या सर्वांना ते भक्तिमार्ग सांगून सन्मार्ग दाखवीत असत. संत शांतप्पा हे अजातशत्रु होते. त्यांच्या हजारों शिष्यांत त्यांचा आवडता शिष्य कृष्णा नांवाचा ब्राह्मण होता. त्यास त्याचे गुरु कृष्णाप्पा म्हणत. त्याचेवर शांतालिंगाप्पांची पूर्ण कृपा होती. त्याची हकीगत थोडी दिली म्हणजे शांतेश्वरमहाराजांचें चरित्रही विशेष दिसणार आहे, म्हणून या गुरुशिष्यांची अल्पशी कथा लिहित आहें. या कथेस भक्तमंजरीमाला अ. १२ याचा आधार आहे.

## शिष्य कृष्णाप्पा

श्रीदासपंचायतनांतील जयरामस्वामी वडगांवकर यांचे गुरु कृष्णाप्पा हे श्रीकृष्णांचे अवतार होत व जयरामस्वामी एकनाथांचे अवतार असें मंजरीकार म्हणतात. सातारा जिल्ह्यांत कृष्णातीरीं बाहुब–बोरगांव हें क्षेत्र आहे. तेथें वेदपाठक यजुर्वेदी ब्राह्मण कुलकर्णी होता. त्याचे उदरीं कृष्णाप्पाचा जन्म झाला. सातवे वर्षी मौंजीबंधन झाल्यावर परमात्मप्राप्तीसाठीं हिंडत असतां शिंगणापुरीं आले. तेथें

शांतलिंग नामें करून । जंगमस्वरूप गिरिजारमण ।
प्रत्यक्षता प्रगटीकरण । दिधलें दर्शन श्रीकृष्णासी ॥ भ. मं. १२।२८

रुद्राक्ष भूषणें जटाभार । विभूतिलेपन व्याघ्रांबर ।
शंखपाणि कौपिन सुंदर । ज्ञान विचार त्रिनैन तो ॥ २ ॥
भवभाव्य उत्तम कांति । देवालयांत पाहिली मूर्ति ॥
दर्शन होतां श्रीकृष्णवृत्ति । जहाली चित्तीं विलीनिता ॥ ३ ॥
आलिंगन देतां परस्परें । येकत्र जाहाले हरिहर ॥
जेवि ककुंद्मति कृष्णातीर । प्रीतिसंगम साचार तयापरि ॥ ३१ ॥

शांतलिंगप्पामहाराज प्रत्यक्ष शिवस्वरूपांत पाहतांच कृष्णानें त्यांचे पायांवर मस्तक ठेविलें. उभयतां गुरुशिष्य निजानंदांत रंगून गेले. नंतर कृष्णाशिष्यानें गुरुजींस परिप्रश्न विनयानें केला.

शांतलिंग सद्गुरुनाथ । कृष्णें नमन केलें तयातें ॥
प्रश्न आदरिला अनुग्रहार्थ । जोडुनि हात अनन्यें ॥ ३२ ॥

श्रीगुरूंनीं शिष्याची प्रज्ञा पहातांच व त्याचा कृष्णभक्तीकडे ओघ दिसतांच त्यास श्रीकृष्णमंत्र दिला व स्वानंदमय केलें.

मग उपदेश करितां त्याचि क्षणांत । श्रीकृष्ण झाले समाधिस्थ ॥
मंत्र सांगुनि निज कर्णात । स्वस्वरूपातें मेळविलें ॥ ३३ ॥
दीपीं दीप येकवटतां । अद्वय प्रकाश सहजि आइता ।
येकात्मता पावलिसता । सहजीं समता अद्वैत ते ॥ ३४ ॥
दृश्य द्रष्टा आणि दर्शन । विरूनि गेली त्रिपुटि जाण ॥
अंतर्बाह्य सोहं स्फूर्ण । उघडले नैनें ज्ञानदृष्टि ॥ ३५ ॥
व्यष्टि समष्टि मायाब्रह्म । अन्वय व्यतिरेक सरला भ्रम ॥
आपला आपण आत्माराम । लाधलें प्रेम श्रीगुरुकृपें ॥ ३६ ॥
ऐसा होता स्वरूपानुभव । तन्मय जाहले श्रीकृष्णदेव ॥
सद्गुरुपदिं जडला भाव । जाहले सेवे तत्पर ते ॥ ३७ ॥

## तीर्थयात्रा

कृष्णाप्पांनीं पंढरपुरास, गोपाळपुरीं, सप्तशृंगावर व जोगाईचे अंब्यास तपाचरण पूर्वींच केलें होतें. त्या तपाचें फल शांतप्पासारख्या अधिकारसंपन्न महात्म्याचे चरण लाभण्यांत झालें. कृष्णाप्पाचे आईबाप लहानपणींच वारले होते व गुरुंनीं त्याचें पुत्रवत् परिपालन केलें होतें. श्रीशांतेश्वरमहाराजांनीं कृष्णाप्पास बरोबर

---

१. कोयना व कृष्णेचा प्रीतिसंगम कऱ्हाडक्षेत्रीं झाला आहे. २ डोळे.

घेऊन काशीयात्रा केली. प्रयाग, काशी, गया येथील यात्रा यथाविधि करून हे गुरुशिष्य अयोध्येस गेले. तेथें कांहीं दिवस राहून ते मथुरेस गेले. मथुरा, गोकूळ, वृंदावन, गोवर्धन हीं कृष्णलीलेनें पावन झालेलीं क्षेत्रें पाहून ते आनंदित झाले.

वृंदावनांत त्यांना फारच सुख वाटलें. श्रीकृष्णपदरजानें पवित्र झालेल्या व्रजभूमींत ते नित्य गडबडा लोळत असत. एके वेळीं कृष्णाप्पास तेथें गुप्तपणें होत असलेली श्रीकृष्ण रासलीला त्यांनीं प्रत्यक्ष दाखविली. या अपूर्व स्थानांत त्यांचें बराच काळपर्यंत वास्तव्य होतें. नंतर ते परत शिंगणापुरास आले.

आतां कृष्णाप्पानें भक्तिमार्गाचे द्वारा लोकोद्धार करावा अशी आज्ञा केली. त्याप्रमाणें कृष्णाप्पानें वडगांव जि. सातारा येथें शके १५०४ मध्यें मठाची स्थापना करून भक्तिमार्गाचा प्रसार करून अनेक लोकांना सत्पंथास लाविलें. एक लंगोटी, अंगावर एक छाटी, बसावयास पांढरें घोंगडें, पाणी पिण्यास तुंबा, यापेक्षां त्यांचे जवळ जास्त संग्रह नसे.

## कृष्णाप्पा एका दिवसांत काशीस जाऊन आले.

या गुरुशिष्यांचा असा आनंदमय काळ गेल्यावर शांतलिंगाप्पांनीं समाधि घेण्याचा विचार केला.

मग कांहीं काळें करून । निर्याण आरंभिलें शांतलिंगानें ॥
भोंवते मिळाले शिष्यगण । जाहलें कारण ऐका तें ॥ ३८ ॥
म्हणति उदईक प्रदोषासी । जाणें आम्हा कैलासीं ।
अवतारलीला समाप्तीसी । जड तनूसि विसर्जितों ॥ ३९ ॥
ऐसें सांगुनि सर्वांप्रति । शांत शिष्यासी आज्ञा करिती ।
काशीहुनि सत्वर गति । अस्तमानाप्रति यावया ॥ ४० ॥
यात्रा गहाण ब्राह्मणापासी । लेहुनि दिधली पत्रिकेसी ।
दोन शत रुपये देऊनि तयासी । आणावें पत्रासि सोडवुनि ॥ ४१ ॥

शांतप्पा सकल शिष्यांस म्हणाले, उदयीक आम्ही कैलासाला जाणार आहोंत. पण काशीयात्रेस गेल्या वेळीं पैसे कमी पडले म्हणून तेथील उपाध्याया-कडून दोनशें रुपये घेतले असून त्यास यात्राफल गहाण देऊन गहाणपत्र लिहून दिलें आहे, तें उद्यां अस्तमानापर्यंत कोणी तरी सोडवून आणलें पाहिजे. अशी विलक्षण आज्ञा होतांच सर्व शिष्य भयभीत झाले. मग स्वामींनीं कृष्णप्पाकडे

पाहिलें. कृष्णाप्पांनीं हात जोडून वंदन केलें. द्रव्य बरोबर घेतलें व तेथील अफाट तळें अतिशय पाण्यानें भरलें होतें. तेथें ईशान्येस ईश्वर दैवत आहे तेथें जाऊन सद्गुरूचें स्मरण करून डोहांत उडी घातली. ते काशीस मणिकर्णिकेचे कांठीं निघाले. तेथील ब्राह्मणास रुपये देऊन यात्रेचें गहाणपत्र घेऊन पुनः भागिरथींत उडी घालून महादेवाचे तळ्याचे वर पूर्ववत् आले व पत्र गुरुमहाराजांना दाखविलें. त्या वेळीं आनंदास प्रेमाचे अंकुर फुटले व शांतप्पा सद्गदित झाले. कृष्णास आज्ञा केल्यावरचें वर्णन मालाकार करतात.

आज्ञा वंदुनि सद्गुरुचरणीं । मस्तक ठेविला प्रीतिकरूनि ।
पत्रिकाद्रव्य घेवोनि । केली करणी अभिनव ॥ ४३ ॥
महादेव क्षेत्रीं विस्तीर्ण तळें । यंत्राकार परम सखोल ।
अष्टौ दिशा दिग्पाळ । स्थापन पूर्विल जेथें पै ॥ ४४ ॥
ईशान्येसि ईश्वरदैवत । हें वर्म जाणितलें कृष्णनाथें ।
शांतलिंग स्मरूनि चित्तें । शिरले डोहांत त्या स्थानीं ॥ ४५ ॥
ब्रह्मवृंदें पाहूनि ऐसें । दुरुक्ति बोलती कृष्णस्वामीस ।
ह्मणति मुकला प्राणास । येईल गुरूस राग म्हणोनि ॥ ४६ ॥
इकडे कृष्णें काय केलें । तळ्यांत शिरोनि काशींत निघाले ।
श्रीमनकर्णिकेचे घाटीं प्रगटले । तेचि वेळीं क्षणामाजी ॥ ४७ ॥
दामाजीची रसद जैसी । पोहचवी यवनासी हृषिकेशी ।
तयापरी विप्रसदनासी । ज्ञानराशि पोंहचले ॥ ४८ ॥
पत्रिकाद्रव्य अर्पोनि । पावती मागुति कैवल्यदानीं ।
मिति पाहतां विस्मयेनीं । आश्चर्य मानिती मनांत ॥ ४९ ॥
तीन महिने चालतां पंथ । काशीक्षेत्रासी मानव येत ॥
तेरिखें दिसती आजिचि निश्चित । काय मात न कळे ही ॥ ५० ॥
श्रीकृष्णपदिं ठेऊनि डोई । विप्रें प्रश्न केला पाहीं ।
वोळख सांगा मज कांहीं । वृत्ति पायीं लीन करा ॥ ५१ ॥
ऐसें वदतांचि तो ब्राह्मण । कृपादृष्टि केला पावन ।
आपण काशींत बुडी मारून । निघाले जाण महादेवी ॥ ५२ ॥

---

१ तारीख =

कृष्णें तळ्यांत पूर्ववत् । प्रवेश केला तेथेंचि त्वरित ।
बाहिर आले श्रीकृष्णनाथ । आश्चर्य मानित सर्वत्र ॥ ५३ ॥
शांतलिंग स्वामीजवळी । येवोनि पत्रिका समर्पिली ।
संतोषली गुरुमाउली । केली साउलि कृपेची ॥ ५४ ॥
कृतार्थ जाहलासि ऐसें वदोन । सांगितलें पुढील कारण ॥
येकनाथ पुन्हां जन्मले जाण । उपदेश करणें तयासी ॥ ५५ ॥

## समाधि

श्रीशांतेपूर्ण प्रसाद । कृष्णस्वामीसी केला शुद्ध ॥
० ० ० । मिळाले सिद्ध सनकादिक ॥ ५६ ॥
तो सोहळा अनुपम्य । विमानिं कोंदलें असे व्योम ॥
पुष्पवृष्टि केली प्रेमें । अमरोत्तमें ते काळीं ॥ ५७ ॥
जाहला वाद्यांचा येकचि गजर । शिवगण करिती जयजयकार ॥
पूजेसिं पातले रमावर । मुख्य देवेंद्र आदि करोनि ॥ ५८ ॥
असो समस्त शिष्य महादेवी । समाधि रचिली अपूर्व वरवी ॥
श्रीकृष्णस्वामी महानुभवी । तारिति भवीं सर्वांतें ॥ ५९ ॥
समाधिपूजन करावया । श्रीकृष्ण राहिले तया ठायां ॥
नवविध भजनीं रंगली काया । सद्गुरुपायीं नत सदा ॥ ६० ॥
जे जे प्राणि शरण येति । कृपेनें तया उद्धरति ॥
अनधिकारी मलते ज्ञाति । पावन होति दर्शनें ॥ ६१ ॥
कांहीं दिवसांनंतर स्वामी । येते झाले बहु ग्रामीं ।
वास्तव्य करूनि स्वआश्रमीं । भजनप्रेमी निमग्न ॥ ६२ ॥

कृष्णाप्पानें काशीहून गहाणपत्र सोडवून एका दिवसांत परत आल्याचें वृत्त वाचून हल्लींच्या जडवाद्यांचा ‘ अशक्य ’ असा निर्णय होईल हें आम्ही जाणून आहोंत. पण सूक्ष्म तऱ्हेनें योगाभ्यास केल्यास आणि या लधिमादि सिद्धीच्या अनुकूल्यानें हें सहज होतें पण याचा अनुभव घेण्यास योगाभ्यासाची अत्यंत जरुरी आहे. ती केल्यास हा अनुभव येईल.

कृष्णाप्पानें यात्रा सोडवून पत्र आणल्याबद्दल शांताप्पामहाराजांस अत्यंत

१ श्रीजयरामस्वामी

समाधान झालें व कृष्णाप्पास आशीर्वाद देऊन भक्तिमार्गाचा प्रसार करण्याची आज्ञा केली. श्रीशांतेश्वरमहाराजांचे निजधामास जाण्याचे वेळीं पुष्कळ संत जमा झाले. देवांनीं विमानांतून शांताप्पावर पुष्पवृष्टि केली. भजनें, कीर्तनें व नामस्मरणाचा रंग उडाला. जिकडे तिकडे वाद्यांचा गजर झाला. शिवगणांनीं त्यांचा जयजयकार केला. समाधीस शांताप्पामहाराज बसले त्या वेळीं शिष्यगणांनीं व कृष्णाप्पांनीं षोडशोपचारें त्यांची पूजा केली. देवही तेथें समाधिउत्सवास प्राप्त झाले. शिवहरी नामाचे गजरांत शांताप्पामहाराज शिवस्वरूपांत लीन झाले. त्या वेळीं एकदम लख्ख प्रकाश पडून बंद झाला. सर्वांस वियोगदु:खाचें भरतें आलें. पण 'मरका गुरु रडका चेला। दोहींचा बोध वाया गेला॥' याप्रमाणें कृष्णाप्पांनीं समजूत केली. समाधीचें कृत्य यथाविधि यथासांग पार पाडलें. तेथें भजनपूजनादि होऊन अन्नसंतर्पणहि बहुत झालें. हा सोहळा संपल्यानंतर शांतामहाराजांचें स्मरण करीत सकल संत आपआपल्या स्थानीं गेले. समाधीचे पूजेसाठीं कृष्णाप्पा कांहीं दिवस तेथें राहिले होते. पूजेची वगैरे व्यवस्थित पद्धति लावून कृष्णाप्पा वडगांवीं निघून गेले.

श्रीशांतप्पामहाराजांचे समाधीस देणग्या वगैरेंचें उत्पन्न नाहीं. त्यांचे भाविक भक्तच समाधीची पूजाअर्चा करितात. हल्लीं त्यांचे समाधीस लागून लहानसाच आश्रम बांधला आहे.

श्रीशांतेश्वरमहाराजांसारखे समदर्शी पुरुष राष्ट्रांत उत्पन्न होऊन जनतेंत व्यर्थ माजलेले पंथभेद दूर करोत अशी श्रीमातेकडे प्रार्थना आहे. श्रीशांतेश्वरमहाराजांचे चरणीं प्रणिपात करून हें चरित्र पुरें करितों.

ॐ। ॐ।। ॐ।।।

श्रीमाता

## कर्णहंस श्लोक

बाडांतील भाषेंत बिलकूल फरक करावयाच्या नाहीं या विचारानें बाड जसेंच्या तसें छापलें आहे. त्यांतील संस्कृत श्लोक बरेच अशुद्ध आहेत; ते चेनवसवेश्वरांनीं केलेले जसेच्या तसेच असतील असें म्हणण्यास आधार नाहीं. तेव्हां लेखकाच्या अज्ञानामुळें श्लोक अशुद्ध लिहिले गेले असेंच समजलें पाहिजे. अभ्यासीयांना उपयोग व्हावा म्हणून ते श्लोक शुद्ध करून येथें मुद्दाम दिले आहेत. श्लोक शुद्ध करून पाठविल्यावद्दल श्री. पेशवे यांचा आभारी आहे.

( १ ) पृथिव्यग्निश्च ऋग्वेदो भवति ॐ रुद्रदेवता ।
अकारेच लयं प्राप्ते प्रथमे प्रणवांशके ॥
( २ ) पवन आकाशो यजुर्वेदो भवतु ॐ देवईश्वरः ।
उकारेच लयं प्राप्ते द्वितीये प्रणवांशके ॥
( ३ ) देवः सूर्यः सामवेदः ॐ सदाशिव देवता ।
मकारेच लयं प्राप्ते तृतीये प्रणवांशके ॥
( ४ ) अकारेच उकारेच मकारेच तृतीयके ।
इदय कं समुमन्त्रं ॐ मिति ज्योतिरूपकम् ॥
( ५ ) ॐकारप्रभवा वेदा ॐकार प्रभवोऽक्षरः ।
ॐकार प्रभवाः सर्वे त्रैलोक्यं सचराचरम् ॥
( ६ ) सर्वव्यापकमोंकारं विना मन्त्रो न शोभते ।
प्रणवं हि परब्रह्म प्रणवं परमं पदम् ॥
( ७ ) ॐकारो नादरूपश्च ॐकारो मन्त्ररूपकः ।
ॐकार व्यापितं सर्वं ॐकारो गोप्य मानयम् ॥
( ८ ) सद्योजाता तथा भूमिर्वामदेवोद्भवं जलम् ।
अघोराद्वन्हेरुत्पत्तिस्तत्पुरुषो वायुरुच्यते ॥
( ९ ) ईशानो गगनाकारः पञ्च ब्रह्ममयंजगत् ।
पञ्चभूतमिदं सर्वं शिववक्त्रसमुद्भवम् ॥
( १० ) शब्दादिः पञ्चविषयो भूमेरंशादि वर्तते ।
चतुर्गणोऽपवर्गस्तु त्रिगुणत्वं तु वन्हिके ॥

( ११ ) वायुश्च द्विगुणः प्रोक्त आकाशश्चैक एव च ।
यत्काठिन्यं सा पृथिवी यद्‌द्रवं जलमुच्यते ॥
( १२ ) यदुष्णंच तत्तेजो वायुः संचरति त्विह ।
आकाशो महदाकाशो भूतधर्म इति स्मृतिः ॥
( १३ ) पीतं श्वेतंच रक्तंच हरितं कृष्णमेवच ।
पृथिव्यादि पञ्चभूतानां वर्णभेदः प्रकीर्तितः ॥
( १४ ) पृथ्वी ब्रह्मा जलं विष्णुस्तथा रुद्रो हुताशनः ।
ईश्वरः पवनो देवः आकाशस्तु सदाशिवः ॥
( १५ ) भूजलाग्निमरुद्व्योम भास्करश्चेतना शशी ।
दिवा प्रकाशते सूर्यो रात्रौ चंद्रः प्रकाशते ॥
( १६ ) सर्वं चैतन्य मात्मानंव्याप्याष्टमूर्तिः शिवः ।
पिंडब्रह्मांडयोरैक्यं क्षेत्रज्ञ परमात्मनोः ॥
( १७ ) सुषुप्त्य व्याकृत्योरैक्यं क्षेत्रज्ञ परमात्मनोः ॥
( १८ ) अस्थिमांसत्वङ्नाडीरोम चैवे तु पंचकम् ।
क्षितिः पंचगुणा प्रोक्ता तस्या अंशाः प्रकीर्तिताः ॥
( १९ ) लाला मूत्रं तथा स्वेदः शुक्रं शोणितमेवच ।
आपः पंचगुणाश्चैव तासामंशाः प्रकीर्तिताः ॥
( २० ) क्षुधा तृष्णा तथा निद्रा आलस्यं संग एवच ।
अग्नेः पंचगुणाः प्रोक्तास्तस्यांशास्तु प्रकीर्तिताः ॥
( २१ ) धावनं वलनं चैवाकुञ्चनंच प्रसारणम् ।
निरोधश्चेति विज्ञेया वायोः पञ्चइति स्मृतिः ।
( २२ ) रागोद्वेषो भयं लज्जा मोहश्चैव यथा तथा ॥
व्योम पञ्चगुणं प्रोक्तं तस्यांशास्तु प्रकीर्तिताः ॥
( २३ ) अहंच प्राणवायुश्च नासिका, गन्ध एवच ।
वायुः पञ्चम इति प्रोक्तमित्येतद्भूमिपञ्चकम् ॥
( २४ ) चित्तं अपानवायुश्च जिव्हा रसनमेवच ।
गुह्यं पंचममिदं प्रोक्तमित्येतद् जलपंचकम् ॥

(२५) बुद्धिरुदानवायुश्च चक्षूरूपं तथैवच ।
पादादि पंचममिदं प्रोक्तमित्येतदग्निपञ्चकम् ॥
(२६) मनो व्यान वायुश्चर्मस्पर्शस्तथैव च ।
पाणिः पंचम इति प्रोक्त मित्येतद्वायु पञ्चकम् ॥
(२७) ज्ञाता समान वायुश्च श्रोत्रं शब्दस्तथैवच ।
वागादि पंचममिदं प्रोक्त मित्येतद् व्योमपंचकम् ॥
(२८) श्रोत्रं नेत्रं च जिव्हा च घ्राणं पञ्चेंद्रियाणिच ।
आकाशो वायुरग्निश्च आपः पृथिवी क्रमेणच ॥
(२९) ईडाश्च पिङ्गलाश्चैव सुषुम्नाच तृतीयिका ।
गांधारी हत जिव्हा च पूषा चैव पयस्विनी ॥
(३०) अलंबुलकुहं चैव शंकिनी दशनाडिकाः ॥
(३१) कुलं छलं धनं चैव रूपं यौवनमेव च ।
विद्या राज्यं तपश्चैव एते चाष्टमदाः स्मृताः ॥
(३२) घृणा शंका भयं लज्जा जुगुप्सेति पंचकम्
कुलं शीलं व्रतंचैव अष्टपाशाः प्रकीर्तिताः ॥
(३३) ज्ञानेंद्रियाणि खलु पञ्च तथा पराणि ॥
कर्मेंद्रियाणि मन आदि चतुष्टयं च ॥
प्राणादि पंचकमथो विविधादिकंच ।
कामश्च कर्म च तमः पुरमष्टमंच ॥
(३४) रसो रुधिरमांसं च मेदो मज्जास्थिरेतसः ।
सप्तधातव इमे प्रोक्ताः सर्व देहसमाश्रिताः ॥
(३५) सत्यं ज्ञानं तपो मौनं श्रुति धर्मस्तितिक्षया ।
उत्साहो निश्चयो धैर्यं सात्त्विकं गुणलक्षणम् ॥
(३६) सर्वक्रोधोऽत्यहंकारः सत्य सङ्गात् पलायनम् ।
आक्रमो दम्भमानौच राजसं गुणलक्षणम् ॥
(३७) अज्ञानमोहानिद्राश्च चापल्यं बुद्धिहीनता ।
पापित्वं परबाधित्वं तामसं गुणलक्षणम् ॥

ॐ ! ॐ !! ॐ !!!

# संपादकीय पुस्तकें



| | | | किंमत |
|---|---|---|---|
| १ | श्रीविष्णुदासांचें चरित्र | ... | ॰।॥॰ |
| २ | श्रीविष्णुदासांची कविता खंड १ ला | ... | २ |
| ३ | " " " २ रा | .... | १॥ |
| ४ | संत बहिरजीचें चरित्र | ... | ॰।॰ |

यांतील नं. २।३ हीं पुस्तकें महिला विद्यापीठ पुणें, या संस्थेनें पी. ए. (एम्. ए.) च्या अभ्यासक्रमास नेमलीं होतीं.

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | श्रीसमर्थ पंचायनांतील 'श्रीकेशवस्वामींची कविता' | ... | ३ |

हें पुस्तक आग्रा युनिव्हर्सिटीनें बी.ए. च्या अभ्यास-क्रमास लाविलें होतें.

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | कर्णहंस | ... | १॥ |

महाराष्ट्रांतील आद्य मराठी लिंगायत संत श्रीशांतलिंग यांनीं लिहिलेला.

पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें.

१ नरहर सदाशिव जोशी, खरशीकर
मु. पो. खरशी, जि. सातारा.

२ शारदाश्रम — यवतमाळ

३ बॅ. श्रीधर वामन नाईक
गौळिगुडा, हैद्राबाद (द.)

# अप्रकाशित पुस्तकें



१ **श्रीविष्णुदासांच्या लावण्या** — यांत शृंगारादि रस असून मधुरभाव फारच श्रेष्ठ दर्जानें आला आहे.

२ **श्रीविष्णुचरितावलि अथवा मातृउपासना** — हें विस्तृत पुस्तक तीन खंडांत मिळून चौदाशें पृष्ठांत प्रसिद्ध होणार आहे. श्रीरामकृष्ण परमहंसाप्रमाणेंच विष्णुदासांची श्रीमातृउपासना श्रेष्ठ आहे. यांत नवरस असून कारुण्या-बरोबर वत्सलभाव फार श्रेष्ठ तऱ्हेनें आला आहे. परमार्थ अत्यंत सोपा कसा व तो मातृउपासनेंत कसा सुलभ होतो हें दाखविलें आहे.

दोन्ही पुस्तकांचे लेखकः—न. स. जोशी, खरशीकरशास्त्री.

३ **वेन्डेल एल. विल्कीकृत एकच जग**

अनुवादक : भालचंद्र लक्ष्मण लिखिते,

एम्. ए., एलएल्. बी.

# हाराष्ट्रांतील पहिला लिंगायत संत

## शांतलिंगाचा "कर्णहंस" ग्रंथ

चारशे वर्षापूर्वी सातारा जिल्ह्यांतील शिंगणापूरचे मठाधिपति शांतलिंगस्वामी
र्थ रामदास-पंचायतनांतील जयरामस्वामीचे आजे गुरु होत. ह्या शांतलिंग
ांनी लिहलेला पहिला मराठी ग्रंथ वे. शा. सं. नरहरशास्त्री खर्शीकर यांना उप-
झाला. व तो श्रीमंत रा. ब. दत्तात्रय कृष्ण उर्फ बाबासाहेब देशमुख
या यांच्या आश्रयाने प्रसिद्ध झाला आहे.

### किंमत एक रुपया

ग्रंथाची किंमत एक रुपया असून सदर ग्रंथांतील लिंगायत सांप्रदायास अनुसरून
गत सांगण्याचें कार्य श्री० ना. रा. बामणगांवकर यांनी केले असून मराठी-
ल पहिला लिंगायत संत ग्रंथकार ह्मणून शांतलिंगस्वामींला त्यांनी अभिवादन केले
हे. शिवाय ग्रंथाबरोबर ग्रंथकाराचे चरित्र असून ग्रंथ कसा व कोठे सांपडला
विषयी प्रकाशकांनीं माहिती दिली आहे.

ग्रंथाच्या प्रति खालील ठिकाणी विकत मिळतील.

'उदय' कार्यालय, अमरावती [वऱ्हाड]
सुदर्शन कार्यालय, सोलापूर.
वीरशैव गर्जना, बार्शी.

( अरुण प्रेस, अ. )

